# डाकिनी विलास.



हें पुस्तक

कविवर्य शेक्सपियरच्या

## मॅकूबेथ

नाटकाच्या आधारें

पाटीलबोवा अर्थात् महादजी शिंदे

आणि

भाऊसाहेब पेशवे अथवा उद्गीरच्या प्रतापी वीर

या पुस्तकाच्या कर्त्यानें

रचिलें

तें

**एस्. पंडित आणि ब्रदर्स. यांनीं.**

मुंबईत

'इंदुप्रकाश' छापखान्यांत छापिलें.



इसवी सन १८९९.



किंमत ८ आणे, ट. हं. १ आणा.

# प्रस्तावना.



प्रकृत नाटक शेक्सपियरच्या 'मॅक्बेथ' नाटकाच्या आधारें रचिलेलें आहे. यांत—स्वतःच्या अतर्क्य अकलेनें तमोगुणी पिशाच्यें मनुष्यप्राण्याला कशीं व्यसनीं पाडितात व नैसर्गिक-शूर, उदार आणि सरळ स्वभावाच्या पुरुषाच्या आंगच्या पूर्वगुणांवर पांघरूण घालून त्याला अनीतिमत्त कसा करून सोडितात, याचें उत्कृष्ठ दिग्दर्शन केलेलें आहे. महत्वाकांक्षेनें [illegible]ाला एकदां पछाडिलें ह्मणजे तो स्वतःस वैभव प्राप्त [illegible] घेण्यास किती व कशी अनन्वित कृत्यें करितो व तीं करण्यास असूयादेवीचा जप करून मोठेपणा मिळवूं पाहणारी स्त्री जर त्याला जोडीदार मिळाली तर एका कुटुंबावरच नव्हे तर हजारो कुटुंबांवर प्रळयाग्नी कोसळून शोकरसानें स्वर्गपृथ्वी-मधील सर्व जागा कशी व्यापून जाते, स्वतंत्र राज्यें अंतस्थ कलहामुळें धुळीला मिळून त्यांना नूतन स्वरूपें कशीं प्राप्त होतात आणि त्यावर पुढच्या पिढीचें सुख किंवा दुःख कसें त्रिशंकू सारखें मध्येंच लोंबकळत राहिलेलें असतें किंवा ज्यांचे खरे हक्क असतात ते दुसऱ्यांच्या महत्वाकांक्षेच्या उच्च मनोऱ्याखालीं दडपून जाऊन खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें एका घटकेंत कसें बनतात हें शेक्सपियरच्या शोक-पर्यवसायी नाटकांत तिसऱ्या प्रतीचें गणिलेल्या 'मॅक्बेथ' नाटकाधारें रचिलेल्या प्रकृत नाटकाच्या अवलोकनावरून समजण्यासारखें आहे.

'मॅक्बेथ' नाटक मूळचें ऐतिहासिक असल्याकारणानें त्यांतील कांहीं पात्रांच्या संबंधानें शेक्सपियरला चांगलासा—नाटकास शोभण्यासारखा—शेवट लावितां आला नसावा, असें तें बारकाईनें वाचणाऱ्याच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. डाकिणी ( Witches ) मालवकेतूला ( Macbeth ) जे वर देतात त्यांची जर पूर्तता होते तर, मालवकेतूला ज्यांनीं वर दिले त्यांनींच वसंतरावाला ( Banquo ) दिले असतां त्याची पूर्णता झालेली कां दृष्टीस पडूं नये ? मालवकेतूला जसें राज्यपद मिळतें तसें वसंतरावाच्या मुलांस कां मिळूं नये ? डाकिणी एकाशीं खरेपणा व दुसऱ्याशीं खोटेपणा दाखवून आपल्या दुटप्पी स्वभावाची साक्ष देतात. त्यांचा शेवट वसंतरावाच्या बाबतींत तरी नाटक या नात्यानें मालवकेतूसारखाच होणें इष्ट आहे. परंतु इतिहासांत वसंतरावाच्या वंशाकडे राज्यपद बऱ्याच वर्षांनीं पुढें आल्याकारणानें कवीला तसें करितां आलें नाहीं. हेंच नाटक जर कवीच्या शीर्षकल्पनेचें अर्थात् ऐतिहासिक नसतें तर प्रत्येक पात्राचा शेवट कवीला चांगलाच लावितां आला असता. असो. आमच्याकडे तें नाटक जर ऐतिहासिक या नजरेनें आह्मीं मराठी तर्जुम्यांत पुढें आणण्याचा प्रयत्न करीत नाहीं, तर ज्या गोष्टी फक्त त्याच कारणामुळें लहान अर्भकासारख्या राहिल्या आहेत त्यांचें पोषण करून त्यांचा इतर गोष्टींप्रमाणें निकाल लाविण्यास हरकत काय ? अर्थात मला ज्या गोष्टी मूळांत अपूऱ्याशा वाटल्या, ज्यांच्या योगानें रंगभूमीवर ज्या रसाची गम्मत उडेल असें वाटलें व ज्याच्या योगानें प्रवेशांना उत्तम स्वरूप येईल असा अजमास झाला तसे यांत फेरफार केलें असून, लहान मुली भातकुलीकरितां आपल्या आईजवळून जशा थालिपीट दशम्या घेऊन खेळतात व शेवटीं चट्टामट्टा करतात, त्याप्रमाणें मालवकेतूला डाकिणींच्या भातकुलाचा पदार्थ मानून त्याच्या देहाचा चट्टामट्टा करण्याच्या कल्पनेवर हें नाटक लिहिलें आहे.

आतां शेवटीं सांगावयाचें इतकेंच कीं, या पुस्तकाच्या पहिल्या अंकावर कै० प्रो० वा० बा० केळकर यांचें कलम उत्तम तऱ्हेचें फिरलें असल्यामुळें तो अंक माझा आहे असें ह्मणण्यापेक्षां त्यांनींच लिहिलेला आहे असें ह्मणणें मला जास्त आवडतें. हौशी लोक याला एकवार तरी अवलोकनाखालीं आणतीलच अशी आशा आहे.

पुस्तककर्ता.



# नाटकांतील पात्रें.



शांतवर्मा—नीलभुवनाचा राजा.

वीरकांत.<br>वीरमणी. } राजपुत्र.

मालवकेतू.<br>वसंतराव. } सैन्यावरचे मुख्य अधिकारी.

जयाजीराव.<br>केदारबा.<br>रक्तपाल.<br>जोतीबा.<br>वंगसेन.<br>आनंदराव. } नीलभुवनांतील सरदार मंडळी.

दत्ताजी.—वसंतरावाचा मुलगा.

हुस्सेनखान.—रक्तभुवनेशाचा सेनाध्यक्ष.

चंद्रसेन.—मालवकेतूचा परिवारगण.

तीव्रसेन.—जयाजीरावाचा मुलगा.

प्रलयादेवी.—मालवकेतूची पत्नी.

चंद्रा.—जयाजीरावाची वायको.

मोहना.—प्रलयादेवीची दासी.

सोपानराव.—एक वृद्ध नागरीक.

मानमोडी.<br>ऊरफोडी.<br>वरगडतोडी. } तीन डाकिणी.

अहितकर्मी.—डाकिनीची अध्यापिका.

वैद्य, सैनिक, वृद्ध नागरीक, पिशाच्यें वगैरे.



# डाकिनी विलास.



## अंक पहिला.



### प्रवेश १ ला.

---

( भयाण रान, मेघ गर्जना चालू आहेत व विजा चमकत आहेत. )

**पात्रें**—मानमोडी, ऊरफोडी आणि बरगडतोडी येतात.

**मानमोडी**— केव्हां, केव्हां, केव्हां ?
आकाश गडगडतें, विजा चमकती, पाऊस खळखळतो,
अशाग थाटानें, पुन्हां भेटू आह्मीं,
केव्हां, केव्हां, केव्हां ?

**ऊरफोडी**— तेव्हां, तेव्हां, तेव्हां !
वाद्यें दुमदुमती, तरवारी चमकती, रक्त पाट वाहती,
शिपाई मरति, कण्हति, रडति, दंगल संपतां,
एकाचा जय होई, दुसरा जित होई, होतिल आपुल्या भेटी,
तेव्हां, तेव्हां, तेव्हां !

**बरगडतोडी**—दंगल संपते सांजच्या अंत, वादळ होतें
संध्याकाळांत, पुन्हां भेटूं आह्मीं,
तेव्हां, तेव्हां, तेव्हां !

**मानमोडी**— कोठें, कोठें, कोठें ?

**ऊरफोडी**— तेथें, तेथें, तेथें !
पिशाच्च माळावर, जळक्या गवतावर,
पडतिल पुन्हां गाठीं, होतिल आपुल्या भेटी.

**बरगडतोडी**—तेथें होईल भेट मालवकेतूशीं.

**मानमोडी**—मांजऱ्या ह्मणतो, म्याँ, म्याँ !

**ऊरफोडी**--बेडक्या करतो ड्राँ, ड्राँ !

**बरगडतोडी**--चलाग बायानों ट्राँ, ट्राँ !

**तिघी**—काळयाचें गोरें, गोऱ्याचें काळें, भोंवताली पसरे धुक्याचें जाळें, आह्मांला त्याची प्रीति, सारी दुनिया भीति.

( नाहींशा होतात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ--गोट.

**पात्रें–शांतवर्मा, वीरकांत, वीरमणी, केदारजी.**

( परिजनांसह येत असतां वाटेंत त्यानां रक्तानें भरलेला हवालदार भेटतो. )

**शांतवर्मा**—अरे, तो रक्तानें सर्वांग भरलेला कोण चालला आहे. बंडखोरांशीं चाललेल्या लढाईतून तो नुकताच आला असावा. असें त्याच्या स्थितीवरून दिसतें. त्याला इकडे बोलवा. तो आपल्याला तिकडची ताजी खबर सांगेल.

**वीरकांत**--शत्रूच्या कावूंत जाण्याचा ज्या वेळीं मला प्रसंग आला होता त्यावेळीं जो शूर व उदार पुरुष शत्रूंशीं बेहद्द लढला व त्यांच्या कचाट्यांतून ज्यानें मला सोडविलें तोच हा रक्तपाल. ये शूर मित्रा, आमचे महाराज लढाईची ताजी बातमी ऐकण्याविषयीं फार उत्सुक झाले आहेत, तर तेवढी त्यांना सांग.

**केदारजी**—त्याच्या एकंदर मुद्रेवरून असें वाटतें कीं तो कांहीं तरी विलक्षण हकीगत सांगणार आहे.

( रक्तपाल येतो. )

**रक्तपाल**--ईश्वर, महाराजांचें कल्याण करो.

**शांतवर्मा**—तूं कोणीकडून आलास ?

**रक्तमाल**—महाराज, मी सुवर्णपुरींकडून आलों. त्या ठिकाणीं त्रिपथेश्वराची निशाणें आकाशांत मोठ्या डौलानें फडकत होती, त्यामुळें आपल्या लोकांच्या मनांत भीति उत्पन्न झाली. नर्वच्या राजानें स्वतः प्रचण्ड सैन्य आणिलें आणि त्या कृतघ्न राजद्रोही त्रिपथेश्वर सरदाराची मदत घेऊन घोर युद्धास आरंभ केला. तें युद्ध मालवकेतू येईपर्यंत तसेंच निकरानें चाललें होतें. शेवटीं त्या रणनवऱ्यानें अथवा साक्षात स्कंदानें अंगांत खंबीर चिलखत चढवून शत्रूंच्या तरवारीशी तरवार व ढालीशीं ढाल भिडवली. मग काय, हां हां ह्मणतां शत्रूंची उर्मट आणि उच्छृंखल ऐट गारठली आणि शेवटीं आपलाच जय झाला.

**शांतवर्मा**—वाहवा, मोठी आनंदाची गोष्ट झाली.

**रक्तपाल**—आणि आतां त्रिपथेश्वर तह करावा ह्मणून पदर पसरून विनवणी करीत आहे. परंतु, आमचे खर्चाबद्दल एक लक्ष मोहरा रोख मोजून दिल्याशिवाय तुमच्या मेलेल्या लोकांस मूठमाति देण्याची सुद्धां परवानगी नाहीं, असें मालवकेतूनीं त्याला साफ सांगितलें.

**शांतवर्मा**—हल्लींच्या त्रिपथेश्वरानें आजपर्यंत आह्मांला फसविलं तें फसविलें यापुढें आह्मीं तसें फसणार नाहीं. तुह्मीं असेच जा आणि " त्याचा शिरच्छेद तावडतोब करावा " हा हुकूम जाहीर करा. त्याच्या अधिकारांचीं वस्त्रें व त्याची जहागार काढून घेऊन ती मालवकेतूला दिलीं आहेत. आजपासून तेच त्रिपथेश्वर! जा त्यांना कळवा.

**रक्तपाल**—महाराजांच्या आज्ञेप्रमाणें सर्व काम बजावतो.

**शांतवर्मा**—एकाचा नाश तो दुसऱ्याचा लाभ. पण त्यांत काय आहे, त्यानें गमावलें तें मालवकेतूनें कमावलें. ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ--पिशाच्यमाळ-विजा व पाऊस.

**पात्रें—मानमोडी, ऊरफोडी, बरगडतोडी,**

**मान०**—ताई तूं कुठें होतीस ?

**ऊर०**—मी डुकरें मारीत होतें.

**बर०**—अन् अक्का तूंग कुठें होतीस ?

**मान०**—एका नावाड्याच्या बायकोच्या ओच्यांत लाल लाल बोरें होतीं; तीं ती तोंड मिटून आंतल्याआंत चघळून सावकास खात होती. मी तिला ह्मटलें ' मला देग थोडीं, ' त्यावर त्या बेडकासारख्या फुगलेल्या सटवीनें काय ह्मटलें " चल निघ हो चालती जा मसणांत–भर्दी डोक्यावर घेऊन. " तिचा नवरा वाघीण नांवाच्या फत्तेमारीचा तांडेल आहे. तो गेला आहे लक्षद्वीपाच्या सफरीला. बरें आहे म्हणावें, तुझी चांगली खोड मोडीन तरच मी नांवाची मानमोडी--

" येग चाळणी, वसुं दे तुझ्या पाळणी,
लागे त्याच्या घूस घरांत, काढीन त्याचें कांडांत,
उठवीन जंगी वादळ, हलवीन दर्यातळ,
फोडीन त्याचें तारूं, चारीन पाणी खारूं. "

**ऊर०**--अक्का, मी किनई तुला तुफान वारा देईन अँ !

**मान०**—आहेसच तशी तूं मायेची.

**बर०**--मीही तुला एका बाजूचा जोराचा वारा देईन.

**मान०**—बाकी सर्व माझ्या जवळ आहे. ज्या ज्या बंदरांत ह्मणून वाऱ्याला जातां येतें तीं तीं सर्व बंदरें माझ्या ताब्यांत आहेत. होकायंत्रांतल्या सर्व दिशा मला ठाऊक आहेत.

सारी बंदरें मी हिंडतें, त्याच्या पाठीं लागतें,
कोठें जातो तें पाहतें, गलबतांतलें पाणी शोषतें,
जीव नकोसा त्याला करितें, त्याची झोप अजी उडवितें,
त्याला कोठें चैन नसावें, जिकडे तिकडे नुकसान व्हावें,

देऊन त्रास रोड करीतें, त्याचे मांस खाऊन टाकितं,
शेवटीं बंदर जरी तो गाठीं, रडवी त्याला वाइळा पाठीं !

**मान०**—अग ह पाहिलेंस कां माझ्या हातांत काय आहे तें.

**ऊर०**—कायग तें दाखिव दाखिव पाहू ?

**मान०**—हा एका दर्यातील वाटाड्याचा आंगठा आहे. फार गमजा करित होता, पण त्याला चांगला खरपूस हात दाखविला. त्याचं गलबत खडकावर घालून, तें फोडून त्याच्या चिंधड्या केल्या. येतांना त्या गमजाखोर वाटाड्याचा हा आंगठा आणला तोडून, हा आतां भारून ठेवूंया.

( पडद्यांत रणवाद्यांचा गजर. )

**वर०**—दुमदुम काय वाजतें ? नौबत वाजते, नौबत वाजते !
तिच्या मागून कोण येई ? मालवकेतु मालवकेतु !

**सर्वजणी**—एकीचा हात दुजी मधीं, डाकिणी आह्मीं जगा मधीं ॥ हिंडू फिरूं चोंहिकडे, पृथ्वी पाण्या पलीकडे ॥ तीन तुझे, तीन माझे, आणखी तीन भरतीचे, ऐसें नऊ फेरे करूं, भातुकली आपली पुरी करूं. ( मालवकेतु व वसंतराव येतात. )

**मालवकेतु**—आजचा दिवस फारच विलक्षण—सुदिन असून दुर्दीनही. चांगल्या आणि वाईट दोन्ही गोष्टीनां आज कसा ऊत आला होता.

**वसंतराव**—येथून सुदर्शनपूर किती दूर आहे. ( डाकिणीस पाहून ) अरे पण ह्या कोण ? किती कृश, यांचा पोषाख तरी किती विचित्र आहे ! हे प्राणी या आमच्या पृथ्वीवरचे रहिवाशी दिसत नाहींत. तर मग हे एथें आले कसे ? (त्यांस) तुह्मांला जीव आहे कां ? अथवा मनुष्यांनां ज्यांनां कांहीं विचारितां येईल अशा प्रकारचे तरी तुह्मीं आहांत काय ? तुमच्या मुद्रेवरून माझें बोलणें तुह्मांला कळतें असें मला वाटतें. तुह्मी स्त्रियांसारख्या दिसता पण पहावें तों तुमच्या ओंठावर लांब लांब दाढ्या दिसतात. आपले लड्ड फुटलेलें

बोट तुह्मीं प्रत्येकीनें आपल्या वाळक्या खरबुज्या ओंठावर ठवण्याचें कारण काय !

**माल०**—तुह्मांला जर बोलतां येत असेल तर तुह्मीं कोण आहांत तें सांगा.

**मान०**—विजय असो तव मालवकेतू वंगेशा !

**ऊर०**—कल्याण असो तव मालवकेतू त्रिपथेशा !

**बर०**—यश वाढो तव मालवकेतू नीलभुवनेशा !

**वसंतराव**—कांहो, असले गोड शब्द ऐकून डचकतां कां आणि भ्यायल्यासारखे काय करितां. ( डाकीणींस ) तुह्मांला शपथ आहे. तुह्मीं ज्या आह्मांला दिसत आहांत हा केवळ कल्पनेचा भास आहे किंवा तुह्मी खरोखरीच आमच्या सारख्या शरीरयुक्त आहां! माझ्या या थोर मित्राला आतांच्या आतां फळास येणाऱ्या मोठ्या लाभाच्या व मागून फळांस येणाऱ्या त्याहूनही श्रेष्ट पदाच्या प्राप्तीचा आशिर्वाद देऊन मोठ्या आनंदांत व आचंब्यांत बुडवून टाकिलें आहे, पण माझ्याशीं तुह्मीं कांहींच बोलत नाहीं. भविष्य कालाच्या गर्भांतील बिजांच्या स्थितीलयाचें तुह्मांला जर परिज्ञान असेल तर कोणत्या बीजाला अंकूर फुटतील व कोणतीं लयास जातील हें मला सांगा. तुमची कृपा व अवकृपा ही दोन्हींही मला सारखींच आहेत. तुमची कृपा असावी ह्मणून मी तुमची कधींही प्रार्थना करणार नाहीं व तुह्मीं माझा द्वेष केलात तरी त्याची मी पर्वाही बाळगणार नाहीं.

**मान०**—कल्याण होवो तुझें !

**ऊर०**—भलें होवो तुझें !

**बर०**—चांगलें होवो तुझें !

**मान०**—मालवकेतू पेक्षां कमी पण त्याहूनही मोठा होशील.

**ऊर०**—त्याचेंच सुख तुला मिळणार नाहीं, पण त्याहूनही अधीक सुखी होशील.

बर०--तूं स्वतः जरी राजा होणार नाहींस, तथापि तुझ्या मुलांबाळांस राज्य खचीत मिळेल. तुमचा दोघांचा जयजयकार असो. तुमचें सर्वस्वी कल्याण होवो.

मान०--वसंतराव आणि मालवकेतू यांचा जयजयकार होवो.

मालवकेतु०--बायांनों, असें अपुर्तें कां बोलतां? थांबा, जाऊं नका, मला आणखी कांहीं विचारायचें आहे त्या विषयीं सांगा. माझ्या बापाच्या मरणानंतर मला वंगप्रांताची सरदारी मिळाली परंतु त्रिपथप्रांताची कशी मिळणार? तो सरदार अजून जिवंत असून त्याचा चालता काळ आहे. ह्मणून त्रिपथाची सरदारी मिळणें जितकें अविश्वसनीय आहे तितकेंच राज्यपद मिळणें हीं आहे असें मला वाटतें. ही अजब खबर तुह्मांला कोठून मिळाली हें सांगा; किंवा असल्या या भयाण रानांत येऊन आह्मांला भेटून असलें भविष्य सांगण्याचें कारण तरी काय? बोला तुह्मांला शपथ आहे.

( डाकिणी नाहींशा होतात. )

वसंत०--पाण्यावर जसे बुडबुडे येतात, तसेंच जमीनीवर ही कधीं कधीं येत असतात, आणि त्यांतलाच हा कांहीं तरी प्रकार असावा. कोणीकडे त्या गेल्या असतील बरें!

मालव०--हवेंत! ज्या आपल्याला शरिरांनीं किंवा रुपधारी दिसत होत्या, त्याच आतां श्वासोच्छ्वासाप्रमाणें वातावरणांत मिसळून गेल्या. त्या थांबल्या असत्या तर बरें झालें असतें.

वसंत०--ज्या प्राण्यांविषयीं आपण बोलत आहोंत, तसले प्राणी खरोखर येथें आले होते कां? किंवा आपण एखादी डोकें फिरवून टाकणारी वल्ली तर खाल्ली नाहींनां?

मालव०--आपलीं मुलें राजे होणार!

वसंत०--आणि आपण तर स्वतःच राजे होणार!

मालव०--त्रिपथाची सरदारी मिळेल असेंच त्या म्हणाल्यानां?

बोट तुह्मीं प्रत्येकीनें आपल्या वाळक्या खरबुज्या ओंठावर ठवण्याचें कारण काय !

**माल०**—तुह्मांला जर बोलतां येत असेल तर तुह्मीं कोण आहांत तें सांगा.

**मान०**—विजय असो तव मालवकेतू वंगेशा !

**ऊर०**—कल्याण असो तव मालवकेतू त्रिपथेशा !

**बर०**—यश वाढो तव मालवकेतू नीलभुवनेशा !

**वसंतराव**—कांहो, असले गोड शब्द ऐकून डचकतां कां आणि भ्यायल्यासारखे काय करितां. ( डाकीणींस ) तुह्मांला शपथ आहे. तुह्मीं ज्या आह्मांला दिसत आहांत हा केवळ कल्पनेचा भास आहे किंवा तुह्मी खरोखरीच आमच्या सारख्या शरीरयुक्त आहां! माझ्या या थोर मित्राला आतांच्या आतां फळास येणाऱ्या मोठ्या लाभाच्या व मागून फळांस येणाऱ्या त्याहूनही श्रेष्ठ पदाच्या प्राप्तीचा आशिर्वाद देऊन मोठ्या आनंदांत व आचंब्यांत बुडवून टाकिलें आहे, पण माझ्याशीं तुह्मीं कांहींच बोलत नाहीं. भविष्य कालाच्या गर्भांतील बिजांच्या स्थितीलयाचें तुह्मांला जर परिज्ञान असेल तर कोणत्या बीजाला अंकूर फुटतील व कोणतीं लयास जातील हें मला सांगा. तुमची कृपा व अवकृपा ही दोन्हींही मला सारखींच आहेत. तुमची कृपा असावी ह्मणून मी तुमची कधींही प्रार्थना करणार नाहीं व तुह्मीं माझा द्वेष केलात तरी त्याची मी पर्वाही बाळगणार नाहीं.

**मान०**—कल्याण होवो तुझें !

**ऊर०**—भलें होवो तुझें !

**बर०**—चांगले होवो तुझें !

**मान०**—मालवकेतू पेक्षां कमी पण त्याहूनही मोठा होशील.

**ऊर०**—त्याचेंच सुख तुला मिळणार नाहीं, पण त्याहूनही अधीक सुखी होशील.

**वर०**—तूं स्वतः जरी राजा होणार नाहींस, तथापि तुझ्या मुलांबाळांस राज्य खचीत मिळेल. तुमचा दोघांचा जयजयकार असो. तुमचें सर्वस्वी कल्याण होवो.

**मान०**—वसंतराव आणि मालवकेतू यांचा जयजयकार होवो.

**मालवकेतु०**—बायांनों, असें अपुर्तें कां बोलतां? थांबा, जाऊं नका, मला आणखी कांहीं विचारायचें आहे त्या विषयीं सांगा. माझ्या बापाच्या मरणानंतर मला वंगप्रांताची सरदारी मिळाली परंतु त्रिपथप्रांताची कशी मिळणार? तो सरदार अजून जिवंत असून त्याचा चालता काळ आहे. ह्मणून त्रिपथाची सरदारी मिळणें जितकें अविश्वसनीय आहे तितकेंच राज्यपद मिळणें हीं आहे असें मला वाटतें. ही अजब खबर तुह्मांला कोठून मिळाली हें सांगा; किंवा असल्या या भयाण रानांत येऊन आह्मांला भेटून असलें भविष्य सांगण्याचें कारण तरी काय? बोला तुह्मांला शपथ आहे.

( डाकिणी नाहींशा होतात. )

**वसंत०**—पाण्यावर जसे बुडबुडे येतात, तसेंच जमीनीवर ही कधीं कधीं येत असतात, आणि त्यांतलाच हा कांहीं तरी प्रकार असावा. कोणीकडे त्या गेल्या असतील बरें!

**मालव०**—हवेंत! ज्या आपल्याला शरिरांनीं किंवा रुपधारी दिसत होत्या, त्याच आतां श्वासोच्छ्वासाप्रमाणें वातावरणांत मिसळून गेल्या. त्या थांबल्या असत्या तर बरें झालें असतें.

**वसंत०**—ज्या प्राण्यांविषयीं आपण बोलत आहोंत, तसले प्राणी खरोखर येथें आले होते कां? किंवा आपण एखादी डोकें फिरवून टाकणारी वल्ली तर खाल्ली नाहींनां?

**मालव०**—आपलीं मुलें राजे होणार!

**वसंत०**—आणि आपण तर स्वतःच राजे होणार!

**मालव०**—त्रिपथाची सरदारी मिळेल असेंच त्या म्हणाल्यानां?

**वसंत**०--हो तसेंच; पण हे कोण इकडे येत आहेत!

( रक्तपाल व वंगसेन येतात. )

**रक्तपाल**०—आपली जयाची खबर ऐकून महाराजांस फारच आनंद झाला! त्या बंडखोरांशीं आपलें जें द्वंद्वयुद्ध झालें व त्यांत आपण जें शौर्य व जें धाडस दाखविलें त्याची हकीगत वाचून महाराजांच्या अंतःकरणांत मोठा गोंधळ होऊन राहिला. एका क्षणीं आपल्या पराक्रमाची तारीफ करावी तों लगेंच हा साराच अद्भुत प्रकार पाहून आश्चर्यानें त्यांची मति गुंग होऊन जावी. यामुळें त्यांना आपल्या मनांत काय चाललें आहे हें बोलून दाखवितां येईना. बरें त्याच दिवशीं पुढची हकीगत सरकार वाचूं लागले तर तेथें याहूनही अचाट प्रकार. धिप्पाड नर्वलोकांच्या फौजेची बेसुमार कत्तल उडवून रणांगणास यमसदनाचें स्वरूप आणिलें आणि त्या विक्राळ देखाव्याची यत्किंचितही भीति न बाळगितां तेथेंही आपण आपला अतुल पराक्रम गाजविला. महाराजांना या प्रसंगांतून आपण व आपला देश कसे सुटतो याची फार काळजी होती. म्हणून त्यांनीं जासुदांची सारखी डांक ठेविली होती व त्यामुळें त्यांना लढाईची ताजी खबर प्रतीक्षणीं मिळत होती. या राज्याचें रक्षण आपण जीवावर उदार होऊन करीत आहां हें ऐकून महाराजांस काय वाटलें असेल हें आपणच पहा.

**वंगसेन**०—आपल्या आजच्या पराक्रमानें महाराज आपले ऋणी झाले आहेत, एवढें आपणांस कळवून, आपल्याला सरकारांपाशीं घेऊन यावें एवढाच आम्हांला हुकूम आहे. आपल्या पराक्रमाबद्दल बक्षीस देण्यास सरकार समर्थ आहेत.

**रक्तपाल**०—सरकार स्वतः आपला जो बहुमान करणार आहेत त्याचें पुरोगामी चिन्ह म्हणून ' त्रिपथाच्या सरदारीचा किताब व तेथील जहागीर आपल्याला दिली आहे.' असा

महाराजांचा हुकुम झाल्यावरून मी येथें आलों आहे. त्रिपथेश्वर, आपल्याला हा गरीब मानकरी प्रणिपात करीत आहे. दासावर मेहर असावी.

**वसंत०**—( एकीकडे ) काय, पिशाच्यांना खऱ्या गोष्टी सांगता येतात !

**मालव०**—त्रिपथाचे सरदार अजून जीवंत असतां उसनें ऐश्वर्य माझ्यावर कां लादितां !

**वंगसेन०**—ज्याकडे ती सरदारी होती तो जरी जिवंत आहे, तरी त्याला देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा झाली आहे व त्या शिक्षेस तो पात्रही आहे. नर्वलोकांस जाऊन मिळाला ह्मणून किंवा वंडखोरांस गुप्तपणें मदत करून त्यांना बंड करण्यास उद्युक्त केलें यास्तव किंवा दोन्हीं तऱ्हेनें आपल्या देशाचा नाश करण्याचा त्यानें प्रयत्न केला ह्मणून, मला पकें कोणचेंच माहित नाहीं, परंतु राजद्रोहाचा घोर अपराध त्यानें कबूल केला व पुराव्यानें तो त्यावर शाबीतही झाला आणि हीच गोष्ट त्याच्या नाशास कारण झाली.

**मालव०**—( आत्मगत ) वंगाधिपती आणि मागून त्रिपथाधिपती, आतां सर्वांत श्रेष्ट मान काय तो राहिला. ( रक्तपाल व वंगसेन यांस ) आपण माझ्याकरितां इतकी तसदी घेतलीत हे माझ्यावर आपले उपकार आहेत. ( वसंतरावास ) आपली मुलें तक्तारूढ होतील ह्या विषयीं आपल्या मनांत आतां आशा उत्पन्न झाली नाहीं काय ? कारण ज्यांनीं मला त्रिपथाची सरदारी मिळेल ह्मणून सांगितलें त्यांनींच तुमच्या मुलांस राज्यपद देऊं केलें आहे.

**वसंत०**—हें भविष्य जर सर्वस्वी खरें मानायाचें तर मग त्रिपथेश्वर होऊनही आपली तृप्ती होऊं नये. नीलभुवनाच्या तक्तावर आपली नजर गेलीच पाहिजे. पण हा मोठाच चमत्कार झाला खरा. मी तुझांला सांगतो, या असल्या भाकितांच्या

नांदी कधीं लागूं नये हेंच चांगलें; कारण ही तमोगुणी पिशाच्चें लोकांस व्यसनीं पाडावें याचबुद्धीनें पुढें होणाऱ्या गोष्टींचें खरें भाकित आपल्यास अगोदर सांगतात आणि तुरळक बाबतींत त्यांचीं भाकितें खरीं झालीशीं वाटून लोकांचीं मनें साहजिकच महत्वाची भाकितें देखील खरींच होतील असें मानूं लागतात. यामुळें लोक अघोरपरिपाकाची कृत्यें करून आपलाच नाश करून घेतात. ( रक्तपाल व वंगसेन यांस ) जरा इकडे या. तुमच्याशीं थोडें बोलायचें आहे.

**मालव०**—( आत्मगत ) वर्तविलेल्या भविष्यापैकीं दोन तर खरीं झालीं. राज्यपदप्राप्तिविषयकनाटकाची ही मंगलप्रद नांदींच ह्मणायची. ( रक्तपाल व वंगसेन यांस ) अहो खरोखरच मी आपला फार आभारी आहे. ( आत्म० ) या अमानुष प्रेरणेला वाईट ह्मणतां येत नाहीं व चांगलीही पण ह्मणतां येत नाहीं. वाईट ह्मणावी तर या कामीं मला यश येईल ह्याची खात्री करून देण्याविषयींच जणूं काय पहिली गोष्ट घडून आली. मी तर त्रिपथाचा सरदार झालों. बरें ही प्रेरणा चांगली आहे असें ह्मणावें तर माझ्या मनांत ही असली ( खून करण्याचा भाव ) भलतीच घोर कल्पना शिरून मला मोह घालूं लागली आहे. किती तरी भयंकर कल्पना ही ? ती मनांत येतांच अंगावर कांटा उभा राहतो व उरांत धडकी बसून हें ऱ्हृदय बरगडया फोडून बाहेर येईल असें वाटतें. मनांत घोर कल्पना आली असतां छातींत जितकें धस्स होतें तितकें एखादें भीतिप्रद कृत्य आपल्या डोळ्यांसमोर घडत असतांही होत नाहीं. माझ्या मनांत खून करण्याचा विचार येतो आहे नाहीं तोंच पहा हे माझें गरीब बिचारें शरीररूपी राज्य दणाणून जाऊन भावनेच्या प्राबल्यानें कर्मव्यापार बंद झाला. माझी दृष्टी फिरून जाऊन जिकडे तिकडे एकच गोष्ट भरलेली दिसते आणि ती केवळ कल्पनामय.

**वसंत०**—पहा आपले सेनापती कसे विचारांत तल्लीन होऊन गेले आहेत ?

**माळव०**—( आत्मगत ) खरोखरच जर माझ्या दैवीं राज्यलाभ असेल तर मी हालचाल न करितांही मला राज्याभिषेक होईल. मग मी कशाला व्यर्थ खटपट करूं?

**वसंत०**—कोरे कपडे प्रथम अंगावर जसे नीट बसत नाहींत परंतु सवईनें ते अंगाला ठीक होऊं लागतात, तसेंच हे बहुमान अजून यांच्या आंगवळणीं पडले नाहींत ह्मणून त्यांना कसेंसेंच होतें आहे.

**माळव०**—(आत्म०) नेमलेली गोष्ट कांहीं चुकावयाची नाहीं. कसाही प्रसंग असला तरी तिची वेळ आली कीं ती व्हावयाचीच. मग उगीच विचारांनीं डोकें तापवून घेण्यांत अर्थ काय ?

**वसंत०**—सेनापतीसाहेब, आह्मीं आपली वाट पहात आहोंत.

**माळव०**—खरेंच, केवढी माझी चूक ही. मेहेरबानीनें चुकीची माफी करा. एक गोष्ट मी विसरलों होतों, ती आठवावी ह्मणून डोक्याला इतका वेळ त्रास देऊन पहात होतों, त्यामुळें तुमचे आभार मानायचे राहिलेच. खरेंच माझें डोकें अगदीं मठ्ठ आहे. जाऊं द्या तें. आपण सर्व दयावंत आहांत. माझ्याकरितां आपण फार श्रम घेतले आहेत. त्याबद्दलचे उपकार मी कधींहीं विसणार नाहीं. ते अशा ठिकाणीं लिहून ठेविले आहेत कीं मला त्यांचा दररोज पाठ करितां यावा. ( वसंतरावास एकीकडे ) वसंतराव, आज ज्या कांहीं अकस्मीक गोष्टी घडून आल्या त्याचा नीट विचार करा. फुरसती अंती त्यासंबंधानें एकमेकांशीं खुल्या दिलानें बोलूं. चला आतां, आपण महाराजांकडे जाऊं.

**वसंत०**—ठीक आहे.

**माळव०**—तोंपर्यंत इतकेंच पुरे. चला.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था.

स्थळ—दरबार.

**पात्रें**— शांतवर्मा, वीरमणी, वीरकांत, केदारजी व इतर दरबारी मंडळी.

**शांतवर्मा०**— काय अजून त्रिपथेशाचा शिरच्छेद झाला नाहीं ? त्या कामगिरीस धाडलेले लोक अजून परत नाहीं आले ? किती उशीर हा ?

**वीरकांत०**—ते लोक जरी अजून परत आले नाहींत तरी, शिरच्छेदाच्या वेळीं समक्ष हजर असलेला एक मनुष्य मला भेटला होता. त्यानें असें सांगितलें कीं, त्रिपथेश्वरानें त्या वेळीं आपला घोर अपराध निष्प्रांजल बुद्धीनें कबूल केला व महाराजांची क्षमा मागून आपल्याला पुरा अनुताप झाला आहे असें त्यानें सांगितलें. त्याचें मरणकालचें वर्तन जितकें त्याला शोभलें, तितकें त्याच्या साऱ्या जन्मांतील एकही कृत्य त्याला शोभलें नाहीं. प्राणासारखी प्यारी चीज–पण ती सोडतानां त्यानें यत्किंचित देखील दुःख दाखविलें नाहीं. जणूं कांहीं आपलें जिणें क्षुद्र–टाकण्यासच योग्य–असा त्यानें आपल्या मनाचा धडा केला होता असें दिसलें.

**शांतवर्मा०**—चेहऱ्यावरून मनाची वृत्ती ओळखण्याची एखादी विद्या नाहीं. तशी असती तर बरें झालें असतें. तो गृहस्थ कसा भला सज्जन दिसत असे; माझा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता. ( वसंतराव, मालवकेतू, रक्तपाल आणि वंगसेन येतात त्यांस पाहून ) यावें बंधुराज, आपण फार थोर. आपल्यासंबंधानें मी पूर्ण कृतज्ञता दाखविली नाहीं हें फार माझ्या मनाला डिवचतें आहे. तुमचा मी कसा उतराई होईन या काळजीनें माझें मन दडपून गेलें आहे. तुमचे उपकार इतके झाले आहेत कीं, ते माझ्या प्रत्युपकारांनीं कधींही फिटायचे नाहींत. मला असें वाटतें की, तुह्मी माझ्यावर उपकारांचें एवढें जबरदस्त ओझें

लादलें नसतें तर बरें झालें असतें. म्हणजे तुमच्या योग्यतेच्या मानानें मला तुम्हांला बक्षीस देतां आलें असतें, आणि आभारही तदनुरूप मानिले असते. मी आपले सर्वस्व जरी तुम्हांला दिलें तरी उपकारांची फेड व्हावयाची नाहीं. असें म्हणण्यापलीकडे मी आतां काय करणार ?

**मालव०**—सरकार, स्वामीसेवा आणि स्वामीभक्ति आम्हीं महाराजांना अर्पण कराव्या हाच आमचा धर्म. आपआपल्या धर्माप्रमाणें वागणें यापेक्षा समाधानकारक या जगांत कोणचीच स्थिती नाहीं. आमच्या सारख्या प्रजाजनांनीं अर्पण केलेल्या कर्तव्यसेवांचा स्वीकार करणें हाच महाराजांचा धर्म आणि तेवढाच आपण करायचा. दासानें सेवा करावी स्वामीनीं ती स्वीकारावी. आमची ही शरीरें आपल्या सेवेला अर्पण केलेली आहेत. इमानें इतबारें आमच्या हातून होण्यासारखी असेल ती ह्या गादीची चाकरी आम्हीं करावी हेंच आमचें कर्तव्य, आणि त्यांतच आमच्या जन्माचें सार्थक्य. त्याबद्दल निराळें बक्षीस कशाला पाहिजे?

**शांत०**—तुमच्या उत्कर्षाचें आज नुकतेंच बीज पेरिलें आहे. त्याचा मोठा वृक्ष करणें माझें काम आहे; आणि तें मी मोठ्या काळजीनें करीन. वसंतराव, तुमच्याही उपकारांची योग्यता कांहीं कमी नाहीं; आणि सर्व लोकांना हें कळावें म्हणून, मला तुम्हांस उराशीं धरून कडकडून भेटूं द्या.

**वसंत०**—महाराज, मला नेहमीं आपल्या हृदयाशींच धरा आणि तेथेंच वाढूं द्या. आपल्या कृपेनें माझें वैभव कितीही वाढलें तरी तें आपलेंच रहाणार, तेव्हां त्याचीं सुफलेंही आपल्यालाच मिळालीं पाहिजेत !

**शांत०**—माझी आनंद समृद्धी परिपूर्णतेनें व अतिरेकानें उतूं जाऊन, दुःखसूची अश्रुंच्या रूपानें डोळ्यांतून बाहेर पडूं पहात आहे. पुत्रानों, आप्तानों, व ज्यांचा म्हणून आमच्याशीं

संबंध आहे असे सर्व लोक हो, आमचे प्रियआप्तबंधू मालव-केतू यांच्या पराक्रमानें राज्यांतील सर्व बंडाळी मोडून जिकडे तिकडे आतां शांतता झाली आहे. तेव्हां ज्या दिवस आमच्या मनाचा संकल्प झाल्याप्रमाणें आम्ही हें राज्यशकटाचें जूं आमच्या खांद्यावरून उतरणार. हा वीरकांतही आतां राज्य चालविण्यास योग्य झाला आहे. तेव्हां आम्हीं असें जाहीर करितों कीं, आजपासून आम्हीं आमचे ज्येष्ठ चिरंजीवांनां गादीचे मालक नेमिले असून त्यांना युवराज ही पदवी दिली आहे. ह्यांनां एकट्यानांच आम्हीं एवढा मान देतो असें नाहीं. त्यांच्या बरोबर सर्व लायक व इमानी सरदारांस त्यांच्या दर्जाप्रमाणें अधीक मानमरातब, किताब वगैरे देण्याचा समारंभ यमदुर्ग किल्ल्यांत करूं. मालवकेतू, आपल्या यमदुर्ग किल्ल्यांत आम्हीं एकच दिवस राहून आमचें आदरातिथ्य करण्याची तुम्हांला तसदी देणार. या तऱ्हेच्या सहवासापासून आपलें आणि आमचें नातें दृढतर होईल असा आमचा अंदाज आहे.

**मालव०**—यांत तसदी कसली? महाराज, आमचा उद्योग जसा महाराजांनां अर्पण केला आहे तसाच विश्रांतीचा सदुपयोग म्हणजे ती महाराजांच्या सेवेंत घालविणें हा होय. मीच स्वतः पुढें जाऊन महाराजांच्या आगमनाची कर्णामृतवार्ता माझ्या पत्नीला सांगून तिला आनंदी करतो. मला जाण्याची आज्ञा असावी.

**शांत०**—ठीक आहे त्रिपथेश्वर!

**मालव०**—( आत्मगत ) युवराज अँ! हीच पहिली पाहिरी माझ्या वाटेंत आली. हीच्या डोक्यावर पाय ठेवून वरतीं चढलें पाहिजे. कदाचित् हिनें माझा पाय ठेंचाळून मी सपशेल पालथा पडून माझे दांत पडतील. हे नभोमंडलस्थ तारकानों, आज रात्रीं तुम्हीं आपलें तेज झांकून ठेवा. माझ्या तामसी, कृष्ण, अगाध, गूढ–इच्छा आणि बेत प्रकाशगोचर

होवूं देवूं नका. हातानें कर्म होत असतां डोळ्यांनां जर तें बघवलें नाहीं तर त्यांनीं पाहिजे तर गच्च मिटून बसावें. पण जें कृत्य झाल्यावरहीं डोळ्यांनां पाहवणार नाहीं असें घोरकर्म घडलेंच पाहिजे. ( जातो. )

**शांत०**--वसंतराव, आपण ह्मणतां तेंच खरें. ते तसेच शूर आहेत. त्यांची स्तुती माझ्या कानाला अमृताप्रमाणें गोड लागते. आपलें आगतस्वागत मोठ्या थाटानें करावें ह्याविषयीं मालवकेतू किती उत्सुक आहेत पहा. सारी तयारी करण्यासाठीं ते गेले देखील पुढें निघून.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

यमदुर्गांतील एक खोली.

### प्रलया देवी पत्र वाचीत येते.

**प्रलया देवी०**—" जयाच्या दिवशींच त्या मला भेटल्या. खात्रीलायक बातमीवरून असें मला समजतें कीं, त्यांनां माणसांच्या शक्ती बाहेरच्या गोष्टी समजतात. त्यांनां आणखी पुष्कळ गोष्टी विचारण्याची मला फार उत्कठ ईच्छा होती परंतु त्या वायुरूपी होऊन केव्हांच अदृश्य झाल्या. माझें मन आश्चर्यानें थक्क होऊन या गोष्टींविषयीं तर्क करण्यांत गुंग झालें असतां महाराजांकडून जासूद येऊन त्यांनीं त्रिपथेश्वर या किताबानें माझें अभिवंदन केलें. ह्याच नांवानें त्या दिवशीं पूर्वींच त्या डाकिणींनीं माझें अभिवंदन केलें होतें; आणि त्याच वेळीं नीलभुवनेश या शब्दांनीं कधीं तरी येणाऱ्या दिवसाची अगाऊ सूचना त्यांनींच मला दिली. तूं माझ्या मोठेपणाची समभागिनी आहेस ह्मणून तुला ही गोष्ट तावडतोब कळविणें मला रास्त वाटतें. असें न केलें तर तुझ्या आनंदाचा वांटा तुला न दिल्याचा दोष माझ्या माथीं

येणार. ही गोष्ट मनांतल्या मनांत अगदीं गुप्त ठेवायची. अधीक काय लिहूं"

वंगेश्वर तर आहांतच, नि आतां त्रिपथेश्वरही झालांत. मग त्या डाकिणींनीं केलेल्या भाकीतांतली राहिलेली शेवटची पाहिरी तरी आपल्याला कां मिळणार नाहीं—खचीत मिळेल. पण आपलें मन तें तसें आहे, त्यामुळें मला शंका वाटते. तें भूतदयेनें तुडुंब भरलेलें असल्यामुळें आपलें काम साधण्याचा रस्ता सोपा नि जवळचा असूनही आपण तो पतकरण्याला कांकु कराल. मला भीती वाटते कीं तें आपलं भेभळें मन कचरेल. मोठें होण्याची ईच्छा तर आहे. राज्यलोभ आपल्याला नाहीं असा नाहीं. पण त्या इष्टपदाला जाऊन पोंचण्यासाठीं जो चिखलाचा नि घाणेरडा रस्ता तुडविला पाहिजे तो तुडविणें मात्र आपल्या जिवावर येईल. एखाद्या गोष्टीचा लोभ अतिशय करायचा; पण ती अगदीं सात्वीक रीतीनें मिळविण्याची इच्छा धरायची. स्वतःकपट करून मिळविण्याची इच्छा नाहीं; पण, अन्यायानें एखादी वस्तू मिळाली तर आपणांकडून कांहीं हरकत नाहीं. असें कांहीं विचित्र आपलें मन आहे. महाराज, आपल्याला जें राज्यपद हवें आहे, तेंच आपल्याला असें सांगतें आहे कीं ".मला जर मिळवायचें असेल तर याच मार्गानें आलें पाहिजे." तें कृत्य स्वतः करायला आपल्याला भीती वाटते; पण परस्पर झालें तर आपण कांहीं नाखूष नाहीं. आतां आपण इकडे लवकर या, म्हणजे आपल्या कानांत माझ्या धैर्य वल्लीचा रस मी पिळते. सुदैवानें नि त्या डाकिणींच्या साह्यानें आपल्याला जो सोन्याचा मुकुट मिळणार आहे, त्याला आडथळा आणूं पाहणारे आपल्याच मनांत जे क्षुद्र किंतु येऊं पहाताहेत, ते सगळे मीं आपल्या वाक्‌शौर्यानें पिटाळून लावीन तरच नांवाची प्रलयादेवी! (गडी येतो) कायरे काय बातमी आहे?

**गडी**—शांतवर्मामहाराजांची स्वारी आज येथें येणार आहे.

**प्रलया०**—तुला वेड तर नाहींना लागलें ? सरकारस्वारी-बरोबर तुझे यजमान नाहींत वाटतें ? सरकार येणार असते तर तयारी करण्याकरितां अगोदर कळविलें नसतें कां झालें !

**गडी**—बाई साहेब, रागावूं नका ! मी सांगतों हें अगदीं खरें आहे. आमच्या पैकीं एकजण यजमानांच्या पुढें तावड-तोब धांवत आला. त्याला निरोप सांगण्यापुरता दमही उरला नाहीं. धापा टाकीत त्यानें तो कसा तरी सांगितला.

**प्रलया**—बरें जा त्याची खाण्यापिण्याची व्यवस्था लाव. त्यानें चांगली बातमी आणली आहे. ( गडी जातो. ) तरी मी म्हणते हें घुबड मघांपासून इतकें ओरडतें आहे कां ! माझ्या घरीं शांतवर्मामहाराजांचें येणें त्यांना किती अशुभ आहे हें हें घुबड पहा कसें आपल्या कर्कश्य स्वरानें सुचवीत आहे. ओरडून ओरडून त्याचा घसा बसला देखील. मनुष्यांच्या मनांतल्या प्राणघात करण्याच्या राक्षसी विचारांना मदत करणाऱ्या देवदूतांनों, माझ्या काळजांतून बाईलपणा काढून टाकून नखशिखांत क्रूरपणा भरून टाका. कोमल विचारांचा माझ्या मनांत मागमूस देखील ठेवूं नका. पश्चात्तापाची दार नि रस्ते सगळे बंद करा. म्हणजे हें क्रूरकर्म करण्याच्या माझ्या निश्चयाला मनाच्या स्वाभाविक डिवचण्या भेवडावणार नाहींत; आणि आरंभापासून अखेरपर्यंत त्या कामांत कोणचीही आडकाठी येणार नाहीं. हे खूनाचे मद्दतगार पिशाच्चानों, तुम्ही गुप्तरूपानें कुठेंही पृथ्वीच्या पाठीवर घातकी कामांत गुंतलां असलां तरी असाल तसें झटकन निघून या, नि ह्या अबलेच्या स्तनांत शिरून गोड दुधाचें कडू जहर वीष करून टाका. हे काळ्या कुट्ट रात्रीं तूंही ये आणि येतांना अंधकूप नरकांतला काळा कभिन्न आंधार बरोबर आणून त्यानें हें जग असें गुरफटून टाक कीं, या

माझ्या जंबीयाला त्याच्या योगानेंच होणारी जखम दिसूं नयें; आणि त्या आंधेराच्या आड काय चाललें आहे हें देवादिकांना सुद्धां डोकावून बघतां येवूं नये; म्हणजे तें कृत्य होत असतां ते मला मध्येंच 'हं थांब' असें म्हणणार नाहींत. ( मालवकेतू येतो. ) यावें महाराज. आपण वंगेश्वर तर पूर्वींच होता. आतां त्रिपथेश्वर झालां आहांत; आणि सर्वतोपरी अभिवंदनीय असा जो मान आपल्याला लवकरच मिळायचा आहे, त्यायोगें तर आपण याहूनही श्रेष्ठ होणार. आपण माझ्या जीवाचे धनी, तेव्हां आपलें पत्र वाचून मला किती आनंद झाला तो कां सांगायला पाहिजे? त्याच्या भरांत त्या क्षुद्र वर्तमानकाळाचें विस्मरण होऊन त्याक्षणींच भावी स्थितीचा मी उपभोग घेत आहे असें मला वाटलें.

**मालव॰**—लाडके, शांतवर्मा महाराजांची स्वारी आज येथें येणार आहे.

**प्रलया॰**—होयका, आणि येथून जाणार केव्हां ?

**मालव॰**—उद्यांच जायचा त्यांचा बेत आहे.

**प्रलया॰**—असें काय ? ज्या उद्यां महाराज इथून परत जातील असा उद्याचा दिवस उगवायचाच नाहीं बरें. महाराज, आपलें तोंड स्वाभाविकच असें आहे कीं, त्याकडे कोणीही पाहिलें असतां बघणाराला असें वाटेल कां आपल्या मनांत कांहीं विलक्षण विचार घोळत आहेत. लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून प्रसंग साधायचा आहे. याकरितां प्रसंगानुरूप बाहेरचें वर्तन ठेविलें पाहिजे. तोंडावर, बोलण्यांत, चालण्यांत, महाराज आल्यानें अगदीं भरपूर आनंद झाल्याचें दाखवा. वरून कसें सालस–निर्मळ फुलासारखें असावें; पण मनांत कृष्ण सर्पाचा डाव. आपल्या इथें आज स्वारी येणार आहे. त्यांची व्यवस्था ठीक लाविली पाहिजे. रात्रीं जे कांहीं मोठें काम करायचें आहे तें माझ्यावर सोंपवा. या रात्रीचें काम

एकदां निर्विघ्नपणे तडीला गेलं, कीं मग, आपल्या आयुष्यांतल्या पुढच्या सगळया रात्री नि दिवस सार्वभौम अधिकारांच्या आणि वैभवाच्या उपभोगांत जातील.

**मालव**०—पुरे, आणखीं जें कांहीं बोलायचें आहे तें मग बोलूं.

**प्रलया**०—पण एवढं मात्र पक्कं ध्यानांत ठेवा. चेहरा कसा निर्मळ–निष्पाप असूंद्या. त्यांत चलबिचल झाली कीं, त्यांपासून धोका आहे. याकरितां मी सांगतें तसें करा. बाकीचें सर्व माझ्याकडे लागलें. आपण स्वस्थ असा.

( जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

यमदुर्ग किल्यासमोरची जागा.

शांतवर्मा, वीरकांत, वीरमणी, वसंतराव, केदारजी जयाजी-राव, रक्तपाल वगैरे मंडळी येतात.

**शांत**०—अहाहा ! हा किल्ला किती शांत आणि रमणीय जागेवर बांधला आहे ! येथें हवा तरी किती मजेदार वाहते आहे ! फार दुरून आल्यामुळें ह्या वाऱ्याच्या शांत झुळुका अंगाला कशा गोड लागताहेत !

**वसंत**०—ह्या माळी पक्ष्यांनीं ज्याअर्थी येथें आपलीं पाळण्यासारखी लोंबती घरटीं बांधिलीं आहेत त्याअर्थी एथली हवा मोठी मोहक आणि निरोगी असली पाहिजे असें सिद्ध होतें.

( प्रलयोदयी येते )

**शांत**०—ह्या पहा आपल्या यजमानीणबाई इकडेच आल्या. यजमानीणबाई, एखाद्या मनुष्याचें आपल्यावर अतिशय प्रेम

असलें ह्मणजे त्याच्या त्या प्रेमापासून आपल्याला कधीं त्रास होत असतो. असें असतांही त्या मनुष्याचें तें खरें प्रेम आहे ह्मणून त्याला आपण मानही देतो. माझ्या मनांत आपल्यावि- षयीं फार प्रेम आहे. ह्यामुळें आपल्याला त्रास पडला म्हणून मला क्षमा करावी.

**प्रलया०**---आह्मीं गरीब माणसें. आमच्या घराण्याची महाराजांनीं जी नुक्तीच मानमान्यता केली आहे, तिची कीर्ती दिगंतरीं झाली आहे. ही योग्यता आपल्याला यावी ह्मणून पदोपदीं महाराजांना अर्पण केलेल्या सेवांची दुप्पट करून पुनःत्याची दुप्पट केली तरी ती आह्मांला मिळायचि नाहीं. आजपर्यंत महाराजांनीं आमच्यावर जे उपकार केले आहेत, आमचा जो बहुमान केला आहे, नि आतां जी आमची थोरवी झाली आहे ह्या सर्वांची फेड करायला आह्मांला किती तरी जन्म घेतले पाहिजेत.

**शांत०**---आमचे सरदार त्रिपथेश्वर कोठें आहेत ? आह्मीं त्यांच्या पाठोपाठ धांवत आलो. आमच्या मनांत त्यांच्या अगोदर येथें येऊन त्यांचीच सरबराई ठेवावी असें होतें. परंतु आपले यजमान घोड्यावर बसणारे मोठे पटाईत; आणि तशांतून घोडाही स्वतःच्या स्वारीचा ह्मणून ते आमच्या अगोदर येऊन पोंचले. वहिनीं साहेब, आज रात्री पुरती ह्या आपल्या पाहु- ण्याची आपल्या घरीं सोय होईल का ?

**प्रलया०**---हें काय विचारणें ? आह्मीं सरकारचे चाकर. आमच्या प्रत्येक वस्तूवर सरकारचा हक्क असून त्या सर्व त्यांच्याच आहेत हे का सांगायला पाहिजे ?

**शांत०**---बरें, आमचे बंगुराज कोठें आहेत ? त्यांच्यावर आमचें फार प्रेम आहे. त्यांना त्यांच्या घरीं या यमदुर्ग किल्यांत केव्हां भेटूं असें झालें आहे. ते जिकडे असतील

तिकडे आह्मांला घेऊन चला. परस्परांची प्रेमबुद्धी अशीच चिरकाल रहावी अशी आमची फार इच्छा आहे. बरें चला.

**प्रलया०**--असें इकडून यायचें.

( सर्व जातात )

---

## प्रवेश ७ वा.

यमदुर्गातील दिवाणखाना.

मालवकेतू विचार करीत येतो.

**मालव**--हें खूनाचें काम जर बिनधोक माझ्या हातून व्हायचें असेल तर तें जितकें झटपट होऊन जाईल आणि त्याचा मागमूस सुद्धां रहाणार नाहीं, असें होईल तर फार बरें. कारण, खून झाला कीं, पुढे त्याचे अनिष्ट परिणाम घडलेच पाहिजेत. ते अनिष्ट परिणाम आह्मीं एकदां छपविले कीं, मग आमचें काम उरकून--यशाचे मालक आम्हींच होणार. माझ्या या कट्यारीच्या एकाच घावात सारें काम होणार आहे. खरोखर आपलें हें जीवित्व ह्मणजे कालरुपी अगाध उदधीचा कांठ आहे. ह्याच्या कांठावर बसून आपण आगामीजन्मानें सुख मिळावें ह्मणून खूनासारखी हवीती भयंकर साहसें जरी करतो तरी, त्यांची प्रायश्चित्तें स्वतःलाच द्यावी लागतात. आपण रक्तपाताची कृत्यें करतो पण तींच पुढें आपल्यावर उलटतात. आपण एखाद्याचा खून करणें ह्मणजे दुसऱ्यानें आपला खून करावा असें त्याला शिकविणेंच आहे. यावरून, जो विषाचा पेला लोकांनीं प्यावा ह्मणून आह्मीं तयार करितों तोच पेला समानदर्शीन्यायदेवता आह्मांलाच पिण्याला भाग पाडते. मी शांतवर्म्याचा खून करणार खरा; पण वास्तविक पाहिलें असतां, तो माझ्या घरीं आज मी त्याचा नातेवाईक आणि प्रजा असा दुहेरी विश्वास ठेऊन पाहुणा ह्मणून आला आहे; तर अशा वेळीं मी स्वतः त्याचा खून करणें किंवा त्याच्यावर

एखादा मारेकरी आला असतां त्याला प्रोत्साहन देणें ह्मणजे केवढी अनीती करणें आहे! शांतवर्म्यानें आपला अधिकार इतका निःपक्षपातानें आणि शांततेनें चालवला आहे कीं, मी त्याचा खून करीत असतां त्याचे सद्गुण देवदुतांप्रमाणें मूर्तीमंत माझ्यापुढें उभे राहून आपल्या घनगभीर शब्दांनीं तें हें कर्म करूं नको असें मला साफ सांगतील. करुणादेवी नुकत्याच जन्मलेल्या वस्त्रहीन पोरक्या पोराप्रमाणें वायुरूप अदृश्य वाहनावर बसून हें माझें भयंकर कृत्य चहुंकडे फिरून जगाच्या नजरेस आपल्या दीनवाण्या रडण्यानें आणील आणि प्रत्येकाच्या डोळ्यांतून सहस्त्रावधीं अश्रुधारा वाहवील. पण असलें घातकी कृत्य करण्याला मला उद्युक्त करणारे एकतरी कारण आहे का? माझ्या मनांत कायती एक प्रबळ उद्दाम महत्वाकांक्षाच आहे. पण तिची गती फार झपाट्याची असल्या कारणानें ज्या जागेवर मला बसावेंसें वाटतें आहे. तेथून मी तोंडघशी पडेन असें मला वाटतें (प्रलयादेवी येते.) कां कसें काय आहे, काय खबर?

**प्रलया**—महाराजांचें जेवण संपत आलें. दिवाणखान्यांतून इकडे कां यायचें?

**मालव**—माझ्याबद्दल महाराजांनीं चवकशी केली कीं काय?

**प्रलया**—ह्मणजे, आपल्याला माहीतच नाहीं वाटतें? ते आपल्याला तिकडे बोलावताहेत.

**मालव**—आपण जें काम करणार आहोंत त्यांत कांहीं हशील नाहीं. कारण महाराजांनीं नुक्तीच आपली मोटी मानमान्यता केली असून चहुंकडे आपली मोठी वाहवा झाली आहे, आणि आपली वर्तणूक सर्वांना पसंत पडली आहे. तेव्हां इतक्यांतच या स्थितीचा धिक्कार न करितां प्रथम आपण आपल्या सद्यांच्या भरभराटीचा पूर्ण उपभोग घेऊं:—

**प्रलया**—वाहवा ! चांगलें ! हे आपले विचार इतका वेळ निजले होते नि जें काम निर्धास्तपणानें करायचे ठरलें होतें तें वाईट आहे, असें सांगायला आतां जागे झाले वाटतं ? केलेला बेत शेवटाला नेण्याच्या कामीं आपलं मन जितकं खंबीर आहे तितकीच माझ्यावरची आपली प्रीति आहे असें यावरून ठरलं तर मग ? आपल्या मनांत जी इच्छा आहे त्यासारखी शौर्याची कृती करून दाखवायला आपल्याला भीति का वाटते ? जी गोष्ट आपल्या जीविताचं भूषण असून ती आपल्याला मिळावी अशी आपली इच्छा आहे, तर मग अशा ऐन प्रसंगीं भित्र्या भागुबाईसारखें काय करता ? भित्र्या कल्पनांनी महत्वाकांक्षेला दडपून टाकणें कांहीं चांगलें नाहीं. माझें धैर्य होत नाहीं. प्रसंगाची वाट पाहूं. असें म्हणून कसें होतें ? काडीनें औषध लावून खरूज जात नसते !

**मालव**—बस्स ! पुरे !अधिक बोलण्यांत अर्थ नाहीं ! शराला योग्य असं हवें तें काम करण्याला मी वाटेल तेव्हां तयार आहे. त्या कामांत माझ्यावर तान करणारा दुसरा साऱ्या जगांत कोणीही नाहीं !

**प्रलया**—असें जर आहे तर ज्यानें मला ही गोष्ट प्रथम कळविली तो शुद्ध नंदीबैल होता म्हणायचा ? हें कृत्य करण्याचा जेव्हां आपण बेत केलात तेव्हां मात्र आपण खरे पुरुष होता ! मी सांगतें—आजपर्यंत जीं आपण कृत्यें केली आहेत त्यांहून जर अधीक कांहीं केलेंत तरच आपण पुरुष या नांवाला अधीक पात्र व्हाल. हें कृत्य करायचें ज्या वेळीं आपण मला सांगितलेंत त्यावेळीं काळ, वेळ, स्थळ हें जरी कांहीं ठरवलं नव्हतें तरी ते सर्व जुळवून आणण्याचा आपण घाट घातला होता, नि आतां तर ते सर्व आपोआप जुळून आलें आहे. असें असतां भिऊन मेलें हें आपलें मन मागें कां घेतं ? आपला धीर असा खचला कां ? पांटच्या गोळयावर आईचें प्रेम काय असतें

याची कल्पना आपल्याला काय असणार ? तें माझें मलाच माहीत ! असें असतां हें काम तडीला नेण्याची आपण जशी शपथ वाहिली आहे तशी मी जर वाहिली असती तर फार तर काय पण माझ्या अंगावर पीत असलेल्या प्रत्यक्ष माझ्या पोटच्या पोराचें डोकें फोडून टाकायला मी कधीं माघार घेतली नसती !

**मालव**—वरें आपला बेत फसला तर ?

**प्रलया**—फसला तर, अहाहा ! आपला धीराचा कंबरट्टा मात्र सैल होऊं देऊं नका ? आजच्या प्रवासाच्या दगदगीनें शांतवर्म्याला लवकर अगदीं गाढ झोंप लागेल. त्याच्या त्या दोघां हुजऱ्यानां त्यांचे देहभान विसरून जातील इतकी दारू पाजते. बुद्धीची दाररक्षी जी स्मृती तिचा एकदां नायनाट झाल्यावर मग बुद्धीचें राज्यच संपलें असें समजावें. दारूनें झिंगून ते दोघे मेल्यासारखे पडले ह्मणजे त्या बिचाऱ्या शांत-वर्म्यावर आपण ठरवलला बेत उरकायला फारच सोपें जाईल. आपलें काम उरकल्यावर त्या कृत्याचें किटाळ आपण त्या दारू प्यायलेल्या त्याच्या हुजऱ्यावर ढकलून देऊं ह्मणजे झालें.

**मालव**—शवास ! तुझ्यापोटीं वीर पुत्रच निपजायचे ! कारण प्रासंगिक हिंमतीच्या तुझ्यासारख्या स्त्रीच्या पोटीं दुसऱ्या प्रकारचा गर्भसंभव अशक्यच आहे. राजाच्या खोलींत निजले-ल्या हुजऱ्यांच्या कट्यारीनेंच काम उरकून त्यांचे कपडे रक्तानें भरवून टाकावे. ह्मणजे ह्या कृत्याचा वहीम त्यांच्यावरच येईल नाहीं वरें ?

**प्रलया**—मग दुसऱ्या कोणावर येणार ! त्याच्या मरणाची बातमी आल्याबरोबर आपणच मोठा घसा काढून ओक्साबोक्शी रडायला लागावें ह्मणजे झालें.

**मालव**—ठीक आहे ! झाला माझा निश्चय ! हें राक्षसी कृत्य करायला मी आपलें सर्व शारीरिकबळ सज्ज करितो.

ना तूं आतां मोठ्या थाटानें आणि आनंदानें जेवणाची वेळ साजरून ने. छद्मी मनाचें कपट कापट्य टानेंच झांकलें पाहिजे. ( जातात. )

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

यमदुर्गांतील एक पटांगण.

वसंतराव आणि त्यांचा मुलगा दत्ताजी कंदील घेऊन येतात.

वसंत०—दत्ताजी, रात्र किती झाली असेल बरें ?

दत्ता०—बाबा चंद्र मावळला.

वसंत०–खरेंचका ? आज चंद्रास्त मध्यान्ह रात्रीला व्हायचा होता.

दत्ता०–मध्यान्हरात्र नुकतीच उलटली असावी असें वाटतें

वसंत०—बरें थांब. ही घे माझी तरवार. ईश्वराच्या घरीं सुद्धां मितव्यय आणि व्यवस्था आहे बरें ! पहा आकाशांत लावलेले चांदण्यारूप दिवे अगदीं नेमक्यावेळीं मालवले ! मला झोंपेनें धरल्यामुळें पापण्या कशा शिशासारख्या जड झाल्या आहेत. तरी पण आतां निजूं नयेसें वाटतें. हे दयाघना, विचारांनां माझ्या मनांत शिरण्याला कायती झोंपेत सवड आहे, ह्मणून जगांतून त्यांचा नायनाट करून टाक. ( मालवकेतू एका नोकराच्या हातांत मशाल जळत असलेली असा येतो. ) आण इकडे ती माझी तरवार, काण आहे ते ?

मालव०—वसंतराव, आपला मित्र मालवकेतू आहे.

वसंत०—आपण अजून निजला नाहीं वाटतें ? महाराज तर केव्हांच निजले. आज महाराज आपल्यावर फार खूश झाले !

त्यांनीं आपल्या सर्व नोकरांनां मोठालीं बक्षिसें दिलीं. अतिथि सत्कारांत प्रलयादेवीवहिनीनीं मोठी कुशलता दाखविली. महाराजांनीं त्यांच्यावर खूष होऊन त्यांनां चोळी बांगडी करतां पंचगांगच्या जहागिरीच्या सनदा त्यांच्या नांवाच्या ह्या करून दिल्या आहेत.

**मालव०**—काय करावें, फार वाईट वाटतें! महाराजांचा यथायोग्य सत्कार करण्याकरतां थोडा अधीक वेळ पाहिजे होता. म्हणजे कसलीही उणीव न पडू देतां मोठी: बहार उडवून दिली असती!

**वसंत०**--छेहो! समारंभांत न्यूनता कोणचीच नव्हती! बरें पण ज्या डाकिणींच्या बोलण्याच्या खरेपणाचा तुह्मांला बराच प्रत्यय आला. त्या काल रात्रीं माझ्या स्वप्नांत आल्या होत्या.

**मालव०**—असतील. त्याबद्दल मी अजून विचारच केला नाहीं. तरी पण त्या गोष्टीचा विचार केला पाहिजे. तुह्मांला फुरसत केव्हां आहे?

**वसंत०**--आपल्याला केव्हां आहे?

**मालव०**--माझा सल्ला जर तुह्मांला घ्यायचा असेल तर त्यांत तुमचा मोठा लौकिक होऊन कल्याण होणार आहे.

**वसंत०**--मला तरी तेंच पाहिजे आहे. परब्रह्म राजभक्तीचा भंग न होतां हें अंतःकरण शुद्ध आणि स्वतंत्र राहून, मानहानि न होऊन कीर्ति वाढेल अशी कोणचीही आपली मसलत घेण्याला मी तयार आहे.

**मालव०**--बरें तें असो. सध्यां तर जाऊन स्वस्थ निजा. पुढें त्याबद्दल पाहूं.

**वसंत०**—मी आपला फार आभारी आहे. आपल्यालाहि आज बरेच श्रम झाले असल्याकारणानें माझ्यासारखी आपल्यालाही गाढ सुखाची निद्रा येवो. (दत्ताजी व वसंतराव जातात.)

**मालव॰**—( नोकरला ) माझें पिण्याचें दूध तयार झालें ह्मणजे मला कळवायला घरांत सांग आणि तूं जाऊन स्वस्थ नीज ( नोकर जातो ) बरें पण मघांपासून माझ्यापुढें ही कट्यार मला कां बरें दिसते आहे ? हिची मूठ माझ्याकडे वळलेली आहे. ये, इकडे ये. मी तुला आपल्या मुठींत गच्च धरतो. अरे ही हातांत मुळींच सांपडत नाहीं ! पण दिसते आहे तर स्वच्छ ! हे प्राणघातकशस्त्रा, तुला जसें रूप आहे, तसा स्पर्श नाहीं का ? अथवा तूं केवळ कल्पना संभव असून संतापतप्त मस्तकांतली मिथ्या प्रसृती आहेस ? ही मी उपसतो आहे इच्याच सारखी स्पष्ट तुझी आकृती असून अशीच मी तुला पाहतो आहे. हें काम करण्याकारितां ज्या मार्गावें मी अवलंबन करणार होतों तोच मार्ग तूं मला दाखवीत आहेस. मी असल्याच शस्त्राचा उपयोग करणार होतो. इतर सर्व इंद्रियांनीं माझ्या डोळयांनां मूर्ख बनविण्याचा प्रयत्न चालावेला आहे किंवा डोळेच सर्व इंद्रियांचें काम करताहेत ? अरे, अजून ही मला दिसते आहे. आतां तर हिच्या मुठविर व पात्यावर रक्ताचे थेंब दिसूं लागले. मघांशीं हे मुळींच नव्हते ! छेः ! ही सर्व माया आहे. माझें पुढलें कृत्य मोठें घातुक व खुनी असल्यामुळें असले हे पदार्थ मला दिसतात. दुसरें कांहीं नाहीं. ही वेळ किती भयंकर आहे ! यावेळीं पृथ्वीच्या अर्ध्या भागावरचे सर्व पदार्थ नष्ट प्रायसे दिसतात. याचवेळीं विश्रामस्थानीं स्वस्थ घोरत पडलेल्या मनुष्यांची झोंप दुष्टस्वप्नें आपल्या भयंकर दर्शनांनीं मोडताहेत. चेटक्या आपल्या आराध्य देवतेला नैवेद्य दाखवितात ती वेळ हीच. लांडग्यांच्या आरोळयावर आपल्या वेळेचें प्रमाण बसविणारे दुष्ट मारेकरी लांडग्यांच्याच हुलींनीं भयाभीत होऊन पिशाच्यासारखे पाऊल न वाजवितां आपला बेत साधण्यास याचवेळीं हिंडतात. हे निश्चल वसुंधरे, मी ज्या वाटेनें जाणार आहे त्या वाटेवरची चाहूल ऐकूं येऊं नये ह्मणून तूं आपल्या कानांत

आपली बोटें घाल. नाहींतर मी कुठें जातों आहे व काय करतों आहे हें तुझ्या पृष्ठीवरील दगड भयानें बडबडूं लागतील. मनांतल्या गोष्टीबद्दल तोंडाची वाफ न दवडतां हातून करून दाखविण्यांतच श्रेय आहे. कर्माचा उच्चार केला कीं त्याला शैथिल्य आलेंच! हा पहा मी निघालों! एथून गेलों कीं झालेंच काम! ( घुबड ओरडतें ) हं ही पहा यमघंटा मला तिकडे जा ह्मणून सांगते आहे. शांतवर्म्या, ही तूं एकूं नको. कारण ही तुला तुझ्या पापपुण्याप्रमाणें नर्कीं किंवा स्वर्गीं आतांच पोंचवणार आहे. ( जातो )

---

## मुका प्रवेश दुसरा.

महाल

( शांतवर्मा निजला आहे. दोघे हुजरे झिंगून अस्ताव्यस्त पडले आहेत. मालवकेतू दबत येतो व कट्यारी घेऊन राजाच्या पलंगापाशीं जातो. इतक्यांत दोघे हुजरे दुस्वप्नामधें करळतात. एकमेकांस जागे करतात. दोघेही दुष्ट स्वप्न निवारणार्थ परमेश्वराची प्रार्थना करतात. )

प. हु.—परमेश्वरा, असल्या भयंकर स्वप्नांनीं पुन्हां आह्मांला भेवडावूं नको. ईश्वर आमचें रक्षण करो!

दु. हु.—तथास्तु. ( मालवकेतू 'तथास्तु' ह्मणण्याचा प्रयत्न करतो. ) दोघेही निजतात. मालवकेतू शांतवर्म्याचा खून करीत असतां—

प. हु.—( स्वप्नांत ) खून, खून ( असें ओरडतो व )

दु. हु.—( खदखद हांसतो. )

( मालवकेतू खून करून रक्तानें भरलेले हात व कट्यारी घेऊन महालांतून बाहेर पडत असतां पडदा पडतो. )

## प्रवेश तिसरा.

यमदुर्गांतील राजवाड्याच्या चौकांतील एक सोपा.

( प्रलयादेवी येते. )

**प्रलया०**—ज्या पदार्थांच्या योगानें ते हुजरे अगदीं निर्जीव होऊन झिंगून पडले आहेत, त्यानेंच मला धीर देऊन धिट्ट केलें आहे. काय तरी बाई नवल हें ! पण ऐका, हं समजलें; हें घुबडाचें ओरडणें आहे. हा प्रत्यक्ष यमाजीपंताच्या घरची घंटा. यावेळीं तें काम तिकडे उरकलें असेल. दारें तर सताड उघडीं आहेत ! यावेळीं ते दारूनें गुंग झालेले हुजरे स्वस्थ हल्यासारखे तिथें घोरत पडून त्यांनीं पहारा करण्याच्या कामाची निव्वळ थट्टाच चालवली आहे ! त्यांनां पाजलेल्या दारूमध्यें अशी कांहीं एक मी वस्तु मिसळली आहे कीं, यावेळीं त्यांचें आयुष्य नि वळ यांमध्यें भांडणच लागलें असलें पाहिजे. ( मालवकेत पडद्यांतून —कोण आहे तिकडे ? ) काय ते मेले जागे होऊन काम तर व्हायचें राहिलें नसेलना ? घडणाऱ्या कृत्याची मी फारशी भीति धरीत नाहीं; पण जर का तें अर्धवट झालें तर मग मात्र आमचा गाडा आटपला ! पण—मी—त्यांच्या कट्यारी—अगदीं तयार करून ठेवल्या होत्या. त्यांनां त्या सांपडल्या तर नसतीलना ? शांतवर्मा निजला होता तेव्हां ता जर मला माझ्या बापासारखा दिसला नसता तर मीच तें काम उरकून टाकलें असतें. ( मालवकेतू खून करून कट्यारी घेऊन येतो. ) कां, उरकलेंना काम ?

**मालव०**—होय ! पण तूं आतां कांहीं गडबड ऐकली नाहींस ?

**प्रलया०**—हो, घुबड घुमत होतीं नि रातकिडे चिरचिरत होते ते मी ऐकलें. तुह्मीच कांहिंससें बोललातनां ?

**मालव०**—केव्हां ?

**प्रलया०**—आतां !

**मालव०**—मी खालीं उतरतानां ?

**प्रलया०**—होय.

**मालव०**—ऐक. शेजारच्या खोलींत कोण निजलें आहे ?

**प्रलया०**—वीरमणी.

**मालव०**—अरेरे–शी–काय–घाणही !

**प्रलया०**—आतां असें ह्मणणें ह्मणजे निव्वळ वेडेपणा आहे.

**मालव०**—त्यांपैकीं एकजण झोपेंत इतक्या मोठ्यानें हंसला व दुसरा 'खून खून' ह्मणून एवढ्या थोरल्यानें ओरडला कीं त्या कल्यानें दोघेही जागे झाले. नंतर त्यांनीं ईश्वराची स्तुती केली व ते पुन्हा निजले !

**प्रलया०**—ते दोघेजण तिथेंच निजले आहेत कां ?

**मालव०**—खून करणाऱ्या मांगाच्या हातासारखे हे माझे ओंगळ हात पाहूनच जणूं काय त्यांपैकीं एकजण 'ईश्वर आमचें कल्याण करो' व दुसरा 'तथास्तु' असें ह्मणाला. 'ईश्वर आमचें कल्याण करो असें जेव्हां तो बोलला तेव्हां तथास्तु हे शब्द माझ्या तोंडावाटे निघेनात—

**प्रलया०**—जाऊंद्या तें ! असल्या गोष्टींचा फार विचार करणें चांगलें नाहीं.

**मालव०**—पण ते शब्द आतां सारखे मघांशी मला कां उच्चारतां येऊं नयेत ? ते शब्द माझ्या गळ्यांत कां अडकून बसावेत ? त्यावेळीं कल्याणाशीर्वादाची मला फार अपेक्षा होती.

**प्रलया०**—असल्या तऱ्हेचे विचार करीत बसून डोकें पिकवल्यानें वेडमात्र लागायचें ! दुसरें तर कांहीं नाहीं.

**मालव०**—आणि त्याचवेळीं 'निजूं नका मालवकेतू झोपेचा खून करतो आहे' असें कोणीतरी बोलल्याचा मला भास झाला. अहाहा ! चिंताजालाच्या अस्ताव्यस्त झालेल्या तंतूंची गुंतागुंत सोडविणाऱ्या निद्रेचा केवढा अगाध महिमा आहे ?

ही निद्रा ह्मटली ह्मणजे, प्राणीमात्राचें नित्य मरण, कावाडकष्टी लोकांचा स्नानविधी, दुःखी आत्म्यांचें मधूर रसायन, स्टष्टीक-कर्माची पुनप्रवर्तिका आणि जीवितोपभोगाची प्रत्यक्ष माता आहे ह्यांत संशय नाहीं.

**प्रलया०**—ह्मणजे, आपल्या या बोलण्याचा अर्थ काय ?

**मालव०**—आणि त्याच आवाजानें घरांतल्या सर्व लोकांनां असें ओरडून सांगितलें कीं, ' उठा वंगशानें झोंपेचा खून केला. त्रिपेथशाला आतां कधींही झोंप येणार नाहीं. मालवकेतू झोंपेला मुकला.

**प्रलया०**— असें बोलणारें तरी मेलें कोण आहे? आपल्या मना प्रमाणें आपली करणी ही शूराची असतां असल्या भित्र्या विचारांनां आपल्या डोक्यांत थारा देता? जा, थोडें पाणी घेऊन ते खूनाचा पुरावा करणारे रक्ताचे हात धुवून टाका. अन् या काटयारी खोलींत टाकायच्या सोडून इथें कशाला आणल्यात ? जा, तिकडे जाऊन त्या निजलेल्या हुजऱ्यांच्या अंगाला रक्त चोपडा नि या तिथेंच टाका.

**मालव०**—नाहीं–आतां–मी–तिकडे जाणार नाहीं. मी केलेल्या त्या घातकी कृत्याचा नुसता विचार मनांत आला कीं, भीतीनें सर्वांग लटलटूं लागतें ! तें खुनीकर्म आतां माझ्याच्यानें पाहवणार सुद्धां नाहीं!

**प्रलया०**—अहारे शेंदाड शिपाई ! दिवे ओवाळा ! या भित्र्याभागूबाईला ह्मणावं तरी काय ? आणा इकडे त्या कट्यारी. मेलेल्यांत नि निजलेल्यांत फरक काय? तीं निव्वळ भिंतावरचीं चित्रें ! त्यानां पोरांनीं भ्यावें ! मोठाले पुरुष भितानां आजच मी पाहतें आहे ! त्याच्या जखमांतून रक्त वाहात असलें तर बरेंच झालें ! नाहींतर या कट्यारींनीं जास्त काढून तें त्या हुजऱ्यांच्या तोंडानां फासतें! ह्मणजे या कर्माचें किटाळ आयतेंच त्यांच्यावर जाईल ! ( जाते व पडद्यांत दार ठोठावतात. )

**मालव०**—दार कुणीकडे ठोठावताहेत ? काय ही माझी अवस्था झाली आहे ! एवढ्याशा दाराच्या ठोठावण्याचा आवाज ऐकला कीं माझे प्राण कासावीस व्हावेत ना ? अरे हे पंजे कोणाचे ? हे माझे डोळे फाडून बुबुळें बाहेर ओरबाडून काढणार कीं काय ? अं—अरेरे—काय—ही—घाण. वरुणाच्या सप्त समुद्रांच्या पाण्यानें तरी हे माझे हात स्वच्छ होतील का ? ( प्रलयादेवी येते. )

**प्रलया०**—हे पहा आपल्या सारखेच माझे हात लाल झाले आहेत. त्यांची मला मुळींच खंती वाटत नाहीं. आपल्या सारखें माझें मन जर नेभळें असतें तर मी जीवच दिला असता ! ( पडद्यांत दार ठोठावतात ) दक्षिणेकडेच्या दारावर कोंणी ठोठावतें आहे. खोलींत जाऊन हे कपडे काढून निजायच्या वेळचे घालूं चला. कारण बाहेर जायची जर वेळ आली तर पंचाईत होईल. चला—आतां तरी भित्र्या विचारांच्या आधीन होऊन बावळ्या सारखें करूं नका. चला—दारावर कोंणी जास्त ठोठावूं लागलें.

**मालव०**—या अघोर कृत्याचा विचार नेहमीं माझ्या मनांत येण्यापेक्षां माझें देहभानच नाहींसें झालें तर काय वाईट ? ( पडद्यांत दार ठोठावतात ) शांतवर्म्या, या अवाजानें जागा हो. तूं जागा व्हावास हेंच माझी खरी इच्छा आहे. ( प्रलयादेवी त्याला ढकलीत नेते. )

---

## प्रवेश चवथा.

यमदुर्ग—दिंडीदरवाजा पुढची देवडी.

( पडद्यांत दार ठोठावणें चाललें असतां निजलेला देवडीवाला उठून बसतो. )

**देवडीवाला**—अरे कोन् हे कोन ? अरे कवाडाला कशापाई धक्के मारतुयास ? नग बाबा आतां ये नरकाचं दार राखनं ! उघाड झांप करतां करतां जीव अर्धा मऱ्याला आला इचिभन् !

( दार ठोठावतात ) हं चालुद्या. मारा बोंब-ठो-ठो-टो. अर कोन हे तत ? तुला हाडळीची शपात है. अं अर कोनर हा ? हा तर नागरखुद्या लंगोच्या ! शेतांत दानं पिकावं म्हून फास लावून घेतोहे ! भामट्या अक्षी येळेवर आलास गड्या ( दार ठोठावतात ) अं अर ह्योर कोन दुसरा ! बोलना कोन त्यो ? तुला झोटिंगाची शपात है. अर ह्योतर गांडूळ ! हा दुतोंड्या हक्ड वि बोलतो अन् तक्ड वि वटवट करतो. तक्ड ग्येला की इकाडच्या न्यारी शपथ व्हातो आन् हक्ड तिकडच्या न्यारी घेतो. पन् ये खरं है- द्येवाप जो लबाडी करतो तो नरकामंदीच पडतो. अन् म्हूनच हा ल्योक हथ आलाया. ( दार ठोठावतात ) अं अन् हार कोन् ? हहहह ! अर हातर न्याव करनारा पैस खाऊ सोदा न्येयाधीश. या रावसाव, दावा आतां आपली न्याव करन्याची शिताफी आंतल्या नरकामंदी. ( ठोठावतात ) या संम्द. लयी ग्वाड सुवास सुटलाया हत नरकामंदी ! या यो हुंगाया. काय जुलूम हये तरी ! इश्रांती म्हून कशी ती न्हाइच ! ही नोकरी नव्ह कार है कार ! नग बाबा आता हत ऱ्हानं ! सम्द्या तऱ्हाचं धंद करनार इक्ता येळ मी या नरकामंदी घुसाडून दिलं; पन हक्ड पाव्ह त देवडीप भायीर आत येन्याची गर्दीच ! बस करा महाराज ! हात जोडतो. घ्या या देवडीवाल्याचा चाकरीला अखरचा रामराम ! ( दार उघडतो व जयाजीराव आणि केदारजी आंत येतात. )

**जयाजी**—कायरे फार वेळ निजला होतास ? किती वेळ आह्मी दार ठोठावीत होतो ! काल रात्रीं निजायला उशीर झाला वाटतं ?

**देवडी०**—म्हाराज, क्वांब्डा दुसऱ्यांदा आरावला तवाप आमी संम्द पिन्याची चंगाळ करीत व्हतो. या नरड्या मंदी त्ये जवा घटाघट जाया लागलं तवा काइ इचारूनगा ! लइ जोर त्येचा ! माज्याशी कुस्ती कराया लागलं न काय ? पन् यो वस्ताद का कमी है व्हय? जवा का त्ये मला टांग माराया लागलं, तवा असा

का कलांडलो व्हतो वगा, पन् काय, त्येच्या त्या पेचावर ध्वांग्डी-मंदी घुसून झ्वाप घेन्याची केली तोड, आन् पाल्ड की चीत !

**केदार०**—म्हणजे तू निजला होतास ? होय किं नाहीं !

**देवडी०**—जी. ( जातो व मालवकेतू येतो. )

**जयाजी**—यावें राम राम.

**मालव**—कसें काय ठीक आहेना ?

**जयाजी**— अगदीं यथास्थित. पण कायहो, सरकार स्वारी, उठली कां ?

**मालव०**—नाहीं अजून.

**जयाजी**— वेळ झाल्यावरोबर उठवावें अशी मला आज्ञा होती. वेळतर होऊन गेली !

**मालव०**—चला, पाहिजे तर मी तुम्हांला त्यांच्या खोलीकडे घेऊन जातो.

**जयाजी**— असलीं कामें करण्यांत आपल्याला नेहमीं आनंद वाटतो. हें जरी मला पक्कें माहीत आहे तरी आपल्याला ही तसदीच आहे.

**मालव०**—कोणचेंही काम आनंदानें झालें असतां त्याबद्दल होणाऱ्या श्रमांचा कधींच त्रास वाटत नाहीं—पण उलट तें श्रम परिहारक गोड—पौष्टिक— औषध वाटतें. हेंच महाराजांच्या खोलीचें दार.

**जयाजी**—जागें करण्याचें काम मला सांगितलें असल्यामुळें जातोच तर धीर करून आंत. ( जातो. )

**केदार०**—महाराजांची स्वारी आजच एथून जाणार काय ?

**मालव०**— असा बेत तर ठरला आहे. मग पहावें काय होतें तें.

**केदार०**—काल रात्रीं केवढें तुफान झालें ! आम्हीं निजलों होतों त्या ठिकाणच्या तुळया एकदम कडाडल्या! लोकांत अशीं वदंता आहे कीं रात्रीच्या तुफानांत शोकोत्पादक आरोळ्या,

खून होत असलेल्या मनुष्यांच्या भयानक किंकाळ्या व भविष्य-वाद्यांच्या भावी गोष्टीं विषयीं सूचक असे ओंगळ कर्कश्य शद्ब हवेंत ऐकू येऊन विपत्कालाचीं सर्व चिन्हें दिसत होती. यमधंटा जीं घुवडें तीं तर आपल्या घूत्कारानें रात्रभर अमंगल गोष्टींना आमंत्रण करीत होतीं. कांहींचें तर असें ह्मणणें आहे कीं या वसुंधरेला काल रात्रीं थडथडून हींव येऊन ती एक सारखी कुडकुडत होती.

**मालव०**--तर मग खरोखरच कालची रात्र मोठी भयंकर!

**केदार०**–माझ्या हयातींत मी अशी रात्र पाहिली नाहीं.

( जयाजी ओरडत येतो.)

**मालव०** } **केदार०** } --काय, झालें तरी काय?

**जया०**– रक्तपाताचा कळस झाला! सिंहासनावर अभिषिक्त झालेलें मस्तक छिन्नविछिन्न झालें! देह इमारतीचें मस्तक-छप्पर कोणी अधमानें फोडून आंतल्या जीव मालकाला हिराऊन नेलें.

**मालव०**-- काय आपण ह्मणता तरी काय? खून झाला? अन् कोणाचा?

**केदार०**--आपल्या महाराजांचा खून झाला ह्मणता?

**जयाजी०**--ह्मणतो इतकेंच नव्हे तर स्वत: जाऊन प्रत्यक्ष पहा आणि आपलीं बुबुळें रक्त बंबाळ करा. जास्त मला कांहीं पुसूं नका. ( मालवकेतू व केदारजी जातात. ) उठा! लोकहो, उठा! शिंग वाजवा! ढोल बडवा! राजद्रोहानें राजहत्या झाली! वीर-कांत, वीरमणी, वसंतराव, उठा! उठा! नित्य मरणाला सोडून खऱ्या मरणाकडे पहा! उठा! पिशाच्य गतीनें येऊन हें काळीज फोडणारें कृत्य प्रत्यक्ष पहा! ( प्रलयादेवी येते. )

**प्रलया०**--बोलाहो बोला! कर्कश्य शिंगाच्या आवाजानें घरांतली सगळीं माणसें जागीं करण्याचें काय कारण तें! सांगा एकदांचें लवकर काय झालें तें?

**जयाजी०**—वहिनी साहेब, घडलेली गोष्ट तुमच्या सारख्या स्त्रीजातीला सांगायला माझी जीभ धजत नाहीं. तुझांला खूनासारख्या गोष्टीं सांगणें ह्मणजे सांगणारानें स्वतःच तो करण्यासारखें आहे. अधीक काय सांगू ! ( वसंतराव येतो ) वसंतराव, आपल्या महाराजांचा कोणी दुष्टानें खून केला हो !

**प्रलया०**—हायरे देवा ! केवढा दुखाचा डोंगर आमच्यावर हा. असेंच जर व्हायचें होतें तर ते देवा, आमच्या घरीं रे कशाला होऊं दिलेंस ?

**वसंत०**—कोठेंही झालें तरी तें वाईटच ! कृत्य मोठें अधमपणाचें झालें ! जयाजीराव, आतां जी खूनाची गोष्ट आपण मला सांगितलीत तिला हरताळ लावून महाराज सुरक्षीत आहेत असें पुन्हां सांगाहो ! ( मालवकेतू व केदारजी येतात. )

**मालव०**—हें असलें राक्षसी कृत्य होण्याच्या पूर्वी एक पळभर जर मी मेलों असतों तर माझें जीवित धन्य झालें असतें ! कारण या मृत्युलोकांत कांहींच अर्थ उरला नसून जिवंत राहणेंहि इष्ट नाहीं. कृपा व कीर्ती यांचा नायनाट होऊन सर्वत्र पोरखेळाचा अमल झाला ! मृत्युचरकानें आमचा जीवित रस पिळून घेऊन आह्मांला चोयट्या केल्या ! आतां आह्मी नुसते फुकट फुशारक्या मारणारे झालों ! ( वीरकांत व वीरमणी येतात. )

**वीरकांत**—काय झालें काय ?

**मालव०**—काय, प्रत्यक्ष तुमचाच घात झाला असून अजून तुह्मांला कळलें नाहीं ? तुमच्या शरीरांत वाहणाऱ्या रक्ताच्या झऱ्याचें उत्पत्तीस्थान नाहींसें झालें ! त्याचा उगम गोठला !

**जयाजी०**—आपल्या मूर्धाभिषिक्त वडलांचा खून झाला !

**वीरकांत०**— हरहर ! कोणाचें हो हें क्रूर कर्म ?

**केदार०**—बहुतकरून महाराजांच्या हुजऱ्यांचें असावें असें वाटतें ! कारण त्यांचे हात, त्यांच्या कटयारी, त्यांचीं तोंड, त्यांचे कपडे सर्व कांहीं रक्तानें भरलेले होते. ते खुनी माणसासारखे आमच्याकडे ताठ डोळे करून पहात स्वस्थ पडले होते !

**मालव०**--आणि ह्मणूनच मी त्यांना ठार केले. पण आतां त्याबद्दल मला पश्चात्ताप होतो आहे.

**जयाजी०**-- अरेरे ! तुम्हीं असें कांहीं केलेंत ?

**मालव०**—दुःखाश्चर्यानें उत्पन्न होणारी विकारवशता व अक्कल एकाच वेळीं कोणामध्यें असूं शकतील? राग आणि शांती एकाचवेळीं एकेठिकाणीं कशी राहणार? राजभक्तीच्या जबरदस्त प्रेमाच्या घाईत मनाला स्थिर करणाऱ्या विवेकाला कसा थारा मिळणार? जखमांतून अंगावर वाहत असलेलें रक्त पाहून मला असें वाटलें कीं, नाशाधिपतीचा प्रवेश होण्याकरितां सृष्टीनें आपले दरवाजे खुले केले आहेत! तिथेंच पलीकडे ते निमकहराम हुजरे खून चढून पडले होते. हें सर्व पाहिल्यावर माझें अंतःकरण प्रेमानें सद्गदीत होऊन त्यांच्याच कटयारींनीं त्यांना मी त्या प्रेमाच्या लहरींत ठार केलें. असा कोण मायेचापूत आहे कीं, अशा प्रसंगीं क्रोधाविष्ट होऊनही गप्प बसेल !

**प्रलया०**—देवा, आतां नाहीं हें माझ्यानें ऐकवत, मग पाहवणार तरी कसें ?

**जयाजी०**—अरे वहिनींची काय ही अवस्था! ( मंडळी तिच्याकडे जातात. )

**वीरकांत**—( वीरमणीस ) या वेळीं आपण स्वस्थ राहिलों तर कसें होणार? या कृत्यांत आपणच उचल केली पाहिजे, अणि तसें करण्याचा आपल्याला हक्कही आहे.

**वीरमणी**—( वीरकांतास ) ज्या ठिकणीं दुर्दैव आपल्या हात धुवून पाठीस लागलें आहे त्या ठिकाणीं बोलून तरी काय उपयोग! चल, आपण कुठें तरी जाऊं. आपल्याला रडण्याचें ढोंग मुळींच करतां येत नाहीं.

**वीरकांत**—( वीरमणीस ) आणि रडून दुःख करीत बसायची ही वेळही नाहीं.

**वसंत**०---अरे वहिनीसाहेब असें काय करतात? ( तिला नेतात. ) चला सर्वजण त्या पलीकडच्या दिवाणखान्यांत एकत्र जमून या निष्ठुर व रक्तपाति कृत्याचा तपास लावण्याचा विचार करूं. या घडलेल्या कृत्याचा सूड घेण्याला मी तयार आहे. मात्र या बावतींत ईश्वरानें मला चांगलें साहाय्य केलें पाहिजे.

**जयाजी**०---माझेंही ह्मणणें तेंच आहे.

**सर्व**---आमचीही इच्छा तीच आहे.

**मालव**०---चला तर मग, चांगले पोषाख करुन तावडतोब दिवाणखान्यांत या.

**सर्व**---ठीक आहे. (वीरकांत व वीरमणीशिवाय सर्व जातात.)

**वीरकांत**०---तुझें कसें काय? माझा निश्चय ठरला. त्यांनां काय वाटेल तें करूं दे. नाटकीं दुःखप्रदर्शनापासून लांब असावें असें मला वाटतें. ढोंगी मनुष्यांनां खोटें रडणें शिकवावें का लागतें? मी तर रक्तभुवनाला जाणार!

**वीरमणी**०---ठीक आहे. मीही पीतभुवनाला जातो. या प्रसंगीं आपण एकमेकांपासून दूर राहिलों तरच आपला बचाव होणार आहे. काय पाजी लोक आहेत पहा! हंसतात मधासारखें, पण तेंच आमच्या छातीवर विषदिग्ध कट्यारी सारखें वार करतें! एकंदरींत त्यांच्या वर्तनावरून असें दिसून येतें कीं, त्यांचा आमचा जितका जवळचा संबंध आहे तितकेंच जास्त ते आम्हांला पाण्यांत पाहतात.

**वीरकांत**---शत्रूंनीं आपल्यावर प्राणघातक शरसंधान केलें आहे. तर तो बाण आपल्या अंगावर येऊन पडण्याच्या पूर्वींच जर आपण त्याच्या रस्त्याच्या आड झालों तर काय वाईट! चल तर. आपले घोडे तयार करून, एकदम, कोणाचाही निरोप न घेतां, ठरल्या ठिकाणीं जाण्याचा रस्ता पकडूं! ज्या ठिकाणीं दया आणि माया यांचे खून झाले तेथें राहण्यांत अर्थ काय?

( जातात. )

---

## प्रवेश पांचवा.

यमदुर्गाच्या बाहेरचो जागा.

**रक्तपाल** व एक **म्हातारा** प्रवेश करितात.

**म्हा०**— सत्तर वर्षांची कशी मला चांगली आठवण आहे. इतक्या वर्षांत मी पुष्कळ भयंकर गोष्टी ऐकल्या आहेत व पाहिल्याही आहेत. पण ती कालची रात्र पाहिल्यापासून मागच्या सर्व गोष्टी तिच्या पुढें कांहीं नाहींत असें आतां वाटूं लागलें आहे.

**र०**— म्हातारे बावा, आपलें म्हणणें अगदीं खरें आहे. मनुष्यांच्या रक्तपाती कृत्यांनीं ईश्वराला त्रास होऊन तो या पृथ्वीला कडक शिक्षा भोगायला लावतो आहे. खरें पाहिलें असतां या वेळीं दिवस चांगला स्वच्छ उगवायचा पण त्या निर्दय रात्रीन, सर्वांना आनंद देणाऱ्या सूर्यदीपकाचा गळा दावून प्राण घेतला असावा असें वाटतें ! ज्या वेळीं स्वच्छ प्रकाशानें अर्ध गोलावर उजेड पाडायचा त्याचवेळीं निबिड अंधःकारानें सर्वत्र आपला अम्मल बसवावा, याला रात्रीचें प्राबल्य म्हणावें कीं, सूर्यालाच या जगावर उगवायला लाज वाटते म्हणावें ? कांहीं तर्कच चालत नाहीं.

**म्हा०**—गेल्या मंगळवारीं एक बहिरीससाणा स्वाभाविक गर्वानें भराऱ्या मारीत असतां एका दिवाभीतानें त्याच्यावर झडप मारून त्याला गट्ट केलेलें जसें मी पाहिलें तशांतलीच ही सृष्टीक्रमाविरुद्ध गोष्ट आहेन् दुसरें काय ? (जयाजीराव येतात.) यावें जयाजीराव ! लोकस्थिति कशी काय आहे ?

**ज०**—काय, तुम्हाला माहीत नाहीं ? आश्चर्य आहे !

**र०**—कालचे रात्रीचें तें दुष्ट कृत्य कोणी केलें त्याचा कांहीं पत्ता लागला का ?

**ज०**—शांतवर्मा महाराजांच्या हुजऱ्यांनां मालवकेतूनीं ठार मारलें हें तुम्हांला माहीत आहेच. त्यांचेंच हें कृत्य असावेंसें वाटतें!

**र०**—कोण भयंकर दिवस तो ! असें करण्यांत त्याचें काय कल्याण होणार होतें कोणाला ठाऊक ?

**ज०**—महाराजांचे दोन मुलगे पळून गेले यावरून त्यांच्या-वरही वहीम आहे. मग खरें ईश्वराला माहीत !

**र०**—आपल्याला जन्म देणाऱ्या बापाचा राज्य लोभानें खून करणें हे चमत्कारिकच नव्हे का? मग आतां बहूतकरून मालवकेतूच गाड्यावर बसायचे असतील ?

**ज०**—असतील कां ! ठरलें सुद्धां; आणि तेवढ्या करतां सुवर्णपुरीकडे त्यांची रवानगी सुद्धां झाली.

**र०**—आपणही तिकडेच निघायच्या तयारींत असाल ?

**ज०**—नाहीं मी पुष्पपुरीला जाणार.

**र०**—वर आहे. मी सुवर्ण पुरीला जातो.

**ज०**—ठीक आहे. तिथें तरी सर्व गोष्टी सुरळीत होवोत ह्मणजे झालें नाहींतर ‘पुढचा. मागल्याला चांगला ह्मणवतो’ अशी मात्र पाळी येऊं नये.

**र०**—येतो तर मग आतां ? बाबा चला. ( जातात. )

---

# अंक तिसरा.



## प्रवेश १ ला.

**स्थल**—सुदर्शनपुरांतील राजवाडा.

**वसंतराव** विचार करीत येतो.

**वसंत**—डाकिणींनीं भाकीत केल्याप्रमाणें, वंगेश, त्रिपथे-श व नीलभुवनेश ह्या तिन्हीं पदव्या जरी तुला मिळाल्या तरी, यांतली शेवटची पदवी मिळविण्याच्या कामांत तूं मोठें घातकी

कृत्य केलें असावें स असा मला संशय येतो. मालवकेतू बद्दलचें सर्व भविष्य जर खरें ठरलें तर, ' त्याच्या मागून त्याच तक्तावर तुझीं मुलें बसतील ' असें माझ्याविषयींचें भाकीत खोटें कसें ठरेल? एकंदर प्रकारावरून त्या डाकिणींच्या बोलण्यांत सत्यता खास आहे असें वाटतें आणि त्या मुळें माझ्या मनांत जो आशेचा अंकूर उद्भवूं लागला आहे, तोही ठीकच आहे. छेः, पण काय हे घाणेरडे विचार! ( तुताऱ्यांचा आवाज होऊन मालवकेतू राजवेष घेतलेला व रक्तपाल वगैरे लोक येतात. )

**मालव॰**— आमच्या समारंभाचे मुख्य वऱ्हाडी तर इथेंच. अशा प्रसंगीं यांनां विसरणें ह्मणजे सबंद स्वैपाकांतून मिठाला रजा देणेंच होय! आज रात्रीं आह्मीं मोठ्या मेजवानीचा बेत केला आहे. तेव्हां तशा प्रसंगीं आपण येऊन तो समारंभ साजरा करावा अशी आमची फार इच्छा आहे.

**वसंत॰**— कोणचीही कामगिरी सांगितली तरी ती बजावण्याला मी तयार आहे.

**मालव॰**— आज दुपारीं तुह्मांला कुठें घोड्यावर बसून बाहेर जायचें आहे कीं काय ?

**वसंत॰**— होय. कांहीं काम आहे कीं काय ?

**मालव॰**— आजच्या दरबारांत आपल्या सल्याची आह्मांला फार जरूर होती. बरें कांहीं हरकत नाहीं! उद्यां करतां येईल तें काम. तुह्मांला फार लांब तर जायचें नाहींना?

**वसंत॰**—जेवणाची वेळ होईतों जितकें दूर जाऊन येववेल तितकें जाण्याचा विचार आहे. घोडा जर मनाजोगा चालला नाहीं, तर दोन घटका रात्र होईल, नाहीं तर संध्याकाळच्या आंतच परत येईन.

**मालव॰**—कांहीं झालें तरी मेजवानीला आलेंच पाहिजे.

**वसंत॰**—ठीक आहे, येईन.

**मालव०**—राज्यलोभानें आपल्या बापाचा खून करून पळून गेलेले ते आमचे दोघें रक्तपाती पुतणे—एक रक्तभुवनाला आणि दुसरा पीतभुवनाला खुशाल जाऊन राहिले आहेत. तिथें आमच्याबद्दल हव्या त्या खोड्यानाड्या कंड्या पिकवून आमची कीर्ति बट्टू करण्याच्या खटपटी करताहेत, असें आह्मांला समजलें आहे. कांहीं हरकत नाहीं. उद्यींक आपल्याला कांहीं सरकारी कामाकरितां एकत्र जमायचें आहे त्यावेळीं याबद्दल विचार करूं. बरें आहे. यावें आतां आपण. आपले चिरंजीव दत्ताजीरावही आपल्याबरोबर यायचे आहेत कीं काय?

**वसंत०**—होय सरकार, आह्मां दोघांनांही जायचें आहे!

**मालव०**—कांहीं हरकत नाहीं! घोडे चांगले चपळ घ्या ह्मणजे यायला वेळ होणार नाहीं. (वसंतराव जातो.) चला आतां तुह्मीं सर्व मंडळी संध्याकाळच्या सात वाजेपर्यंत विश्रांती घ्या. ( एका नोकराशिवाय सर्व जातात. ) काय रे, तुला सांगितल्याप्रमाणें ते लोक आणले आहेस का?

**नोकर**—त्यांनां वाड्या बाहेर उभे केले आहेत. हुजूम होत असेल तर आंत घेऊन येतो.

**मालव०**—जा त्यानां घेऊन ये. ( चाकर जातो ) अशा रितीनें जिवंत राहून मी आनंदांत आहे असें ह्मणण्यांत अर्थ काय! आपलें मनोराज्य, भीतिनें जों पर्यंत गुरफटून गेलें आहे. तों पर्यंत राज्यपद मिळूनही तें नाहीं सारखेंच आहे. आतां मला राज्यकरायला वसंतरावाचीच काय ती भीति राहिली आहे. त्याचा चेहरा व स्वभाव असा कांहीं ईश्वरानें निर्माण केला आहे कीं, पृथ्वीपती सुद्धां त्याच्या पुढें वचकलाच पाहिजे. त्याचें शौर्य आणि शहाणपण समतोल असल्या कारणानें कोणतीही गोष्ट तो मोठ्या सावधगिरीनें करतो. ज्या प्रमाणें कर्ण जिवंत असेपर्यंत शल्यादिकांचें तेज पडलें नाहीं, त्याच प्रमाणें हा जिवंत असेपर्यंत माझ्या बुद्धीवैभवाला खग्रास ग्रहण ला-

गलेलें राहून शौर्यही निस्तेजच राहणार ! त्या डाकिणींनीं मला 'राजा होशील' ह्मणून सांगितलें, तेव्हां त्यानें त्यांच्याशीं मोठ्या आढ्यतेनें आणि उद्धटपणानें भाषण करून आपल्याबद्दल कांहीं माहीत असेल तर सांगा ह्मणून त्यांस विचारलें. तेव्हां 'तूं राजकुलाचा आदिपुरुष होशील आणि मालवकेतूच्या मागून तुझ्या मुलांना त्याचें तक्त मिळेल' असें त्यांनी त्याला सांगितलें. माझ्या मुलांनां जर हें राज्य मिळायचें नसेल तर या हातांत तो शुष्क राजदंड आणि या मस्तकावर तो वध्य मुगुट धारण–करण्यांत अर्थ काय ! भलत्याच कुळांतला कोणी तरी पुरुष येऊन त्यानें हें माझ्या पासून हिसकावून घेतलें ह्मणजें झालें. डाकिणींनीं सांगितलेलें जर सर्व खरें होणार असेल तर मी आपल्याला व्यर्थ काळोखी लावून घेतली; आणि ती कशा करतां, तर वसंतरावाच्या वंशा करतां. काय माझें शहाणपण ! शांतवर्म्याचा मी खून केला, तो काय वसंतरावाच्या कारट्यांकरतां ? त्याच्या कारट्यांकरतां मी आपलें शुद्ध अंतःकरण अमंगल पापानें मळवून सद्गुणादिव्य हिऱ्याचा चक्काचूर केला, असेंचना शेवटीं ठरणार ? असें होण्यापेक्षां नशीबा, अस्तन्यासारून माझ्याशीं लढायला तयार हो ! मी तुझ्याशीं लढणार ! कोण आहे तिकडे ? (दोन मारेकऱ्यांनां घेऊन चाकर येतो.) जा रे तूं दारावाहेर बैस. मी बोलावीन तेव्हां ये ! (चाकर जातो.) कायरे गड्यांनों, कालच आपलं बोलणें झालें ?

**प. मारे.**—जी सरकार.

**मालव॰**—मग त्यावद्दल कांहीं विचार केलात का ? इतके दिवस तुमचे हाल होण्याचें कारण मीच असेंच तुह्मांला वाटत होतेंना ? माझें आचरण किती शुद्ध आहे याबद्दल तुमची आतां खात्री झाली असलीच पाहिजे. तुह्मांला बढती देऊं असें वचन देऊन तें मोडलें कोणी, तुमच्यावर कशी व कोणी संकटें आणली, हें मी तुम्हांला कालच सांगितलें आहे.

तेव्हां या सर्व गोष्टींवरून गटारांवरून तुकडे गोळा करीत हिंड-णारा एखादा वेडापिसासुद्धां असें सांगू शकेल कीं, या सर्व गोष्टींचें बीज वसंतराव आहे.

**प० मारे०**—सरकारनीं त्ये सम्दं आमास्नी समजावलं हायें.

**मालव०**—तेंच काय, त्यांहूनही अधिक सांगितलें होतें; आणि त्याबद्दलचा विचार करण्याकरतांच मुद्दाम आत्तां तुह्मांला एथें बोलावून आणलें आहे. कायरे, ज्यानें तुमच्या जिवावरचे प्रसंग आणून तुमच्या मुलांना जन्मभर अन्नान्न करायला लावलें, त्या मनुष्याचें कल्याण व्हावें, असा तुह्मीं, तुमच्या बायका, तुमची मुलें त्याला कधीं तरी आशीर्वाद द्याल काय ? सूड घेण्याची संधी आली तर ती दवडून तुह्मीं स्वस्थ उपासमार करीत कधींही बसणार नाहीं अशी माझी पक्की खात्री आहे.

**प० मारे०**—सरकार, आमी मानसं होओत !

**मालव०**—माणसें आहांत यांत काय संशय ! ज्या प्रमाणें, शेंपूट पाडून पळणारें गांवठी असो, मेंढरेंराखे धनगरी असो, गोजिरवाणे कुलुंगी किंवा उम्दें पछमी शिकारी असो—सर्वांची गणना श्वानवर्गांतच करायची, त्याच-प्रमाणें तुमची मनुष्यांत करायची. ईश्वरानें कृपाळू-होऊन प्रत्येकाला जे निरनिराळे गूण दिले आहेत त्यांवरून स-र्वांची योग्यता एक सारखी न होतां प्रत्येकाच्या गुणाप्रमाणें त्याचें वर्गीकरण होतें. ह्मणून मी तुह्मांला असें विचारतो कीं अती नीच स्थितीहून अधीक सर्वोत्कृष्ट इभ्रतीची जर तुमची स्थिती असेल तर मला कळवा. ह्मणजे मी आपलें गुप्त काम तुह्मांला सांगतों ! तें काम असें आहे कीं, तें तुह्मीं केल्याबरो-बर तुमचा जर कोणी या जगांत शत्रू असेल तर तो नाहींसा होईल आणि माझ्या मनांत तुमच्या विषयीं जें प्रेम आहे त्याची

आणि तुमची उत्तम तऱ्हेची सांगड जमेल. जो तुमचा शत्रू आहे तोच माझा आहे. तुमच्या प्रमाणेंच हृद्रोगानें मला फार पिडिलें आहे. तेव्हां तो शत्रू एकदां नाहींसा झाला ह्मणजे मग तुझांला आणि मला कोणाचीच भीति उरली नाहीं.

**प० मारे०**—पिरथिवी मंदल्या लई दोड परकारांनीं, संकटांनीं अन् कष्टांनीं हा ध्येह इक्ता तरासला हाये कीं, सूड उगवायाच्याच वख्तावर अक्षी टपून बसलो हाओंत आमी सरकार. त्या कामा मंदी मग काईबी झालं तरी भ्येतर हये.

**दु० मारे०**—माझंबी तसंच. माझ्या परालब्दाची न् माझी पगा सरकार, अक्षी झुंज लागून ऱ्हायली हाये. म्हुन् त्येची परक्षा पगावी असं मला गुमान वाटतया. मंग त्या मंदी हा मर्द गमावला तरी बी हारकात न्हाय.

**मालव०**—तर मग वसंतराव तुमचा शत्रू आहे याबद्दल तुमची दोघांची खात्री झाली ह्मणायची ?

**दोघे मारे०**—ह्येच्या मंदी काईबी संशव न्हाय.

**मालव०**—माझाही तोच शत्रू आहे ! त्याचा आणि माझा इतका द्वेष वाढला आहे कीं, तो जिवंत असेंपर्यंतचा प्रत्येक क्षण बाणाप्रमाणें माझ्या हृदयावर टोंचीत राहणार. या जगांतून त्याला उघडपणें नाहींसा करण्याची जरी मला शक्ती आहे तरी, सध्यां मला तसें करतां येत नाहीं. कारण या ठिकाणीं कांहीं लोक त्याचे आणि माझे दोघांचेही स्नेही आहेत. शिवाय, असें कृत्यकरून मला त्यांचा स्नेह इतक्यांतच तोडणें माझ्या सध्यांच्या स्थितीला योग्य नाहीं. इतकेंच नाहीं तर ज्याला मी मारीन त्याच्याचबद्दल सर्वांबरोबर मला गुजराथ्यांसारखे मोठाले हेल काढून—खोटें तरी रडत बसावें लागेल. याकरतां आणि अशाच कांहीं इतर महत्वाच्या कामाकरतां हें कृत्य नजरेआड ठेवावें ह्मणून मी तुमची मोठ्या प्रेमानें मदत मागितली आहे.

**दु० मारे०**—सरकारच्या हुकुमापरमान काम बजावन्यास आमी तयार हाओत.

**प० मारे०**—मंग त्येच्यात आमचा परान गमावः—

**मालव०**—वस्स पुरे. तुमच्या मनांतला भाव तुमच्या चेहेऱ्यांवरून स्पष्ट दिसतो आहे. बरें आतां तुह्मीं कोणच्या जागीं दबा धरून बसायचें, वार केव्हां करायचा आणि हें कृत्य केव्हां उरकायचें यावद्दल सर्व खुलासेवार मग मी तुह्मांला सांगेन; पण हें काम आज रात्रींच झालें पाहिजे, समजलें ! आतां आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवा. कोणचेंही काम सफाईनें झालेलें मला आवडतें. कारण मग त्यांत भानगड ह्मणून राहत नाहीं. वसंतरावांबरोबर त्यांचा मुलगा दौलतरावही आहे. बापाच्या मरणापासून जितकें मला रडूं येईल तितकेंच लेकाच्याही मरणापासून येणार आहे. जा, एकीकडे जाऊन या गोष्टीचा नीट विचार करा.

**दो० मोरे०**—इचार कराया नग सरकार. आमचा पक्का निच्चव झाला हाये.

**मालव०**—बरें तर. तुह्मीं आतां तिकडे जाऊन बसा. लवकरच मी तुह्मांला बोलावणें धाडतो. ( मारेकरी जातात ) ठरलें. वसंतराव, आटपा आतां. तुमच्या जीवात्म्याला आज रात्रीं जर स्वर्गाला प्रयाण करायचें असेल तर त्याचें प्रस्थान आतांच लवकर ठेवा ! ( जातो )

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—राजवाडा—**प्रलयादेवी** व एक **नोकर**.

**प्रलया०**—कायरे, वसंतराव गेले का ?

**नोकर**—गेले. पण संध्याकाळीं परत यायचे आहेत.

**प्रलया०**—बरें तूं आतां जा आणि सरकार स्वारीला कळव कीं, फुरसत असेल तर मला थोडें काम आहे.

**नोकर**—जी सरकार ( जातो. )

**प्रलया०**—सगळ्या पदव्या मिळून शेवटीं राज्यपदही मिळालें; पण तें मिळून न मिळून सारखेंच. कारण, मनाला जर समाधान असेल तर सगळें गोड वाटतें. आपल्याला सुख व्हावें ह्मणून आपण एखाद्या गोष्टीचा नाश करायचा; पण तें सुख जर संशयात्मक असेल तर नाश करून तरी फायदा काय ! आपल्या सुखाकरतां दुसऱ्याचा नाश करण्यापेक्षां स्वतःचाच करून घेतलेला काय वाईट ! ( मालवकेतु येतो. ) कां कसें काय आहे ? नेहमीं असें अष्ठुरलेलें नि एकलकोंड्यासारखें एकीकडे काय बसायचें ? मेलेल्या माणसांचे नेहमीं कसले विचार ? गेली गत नि फाटलें खत ! आतां काय त्याचें. असें करण्यानें आपल्या सरदारांच्या मनांत भलत्या सलत्या कल्पना नाहीं का यायच्या ? जी गोष्ट निरुपायानें करावी लागली तिची आतां इतकी धास्ती कशाला ? झालें–गेलें–होऊन चुकलें.

**मालव०**—ऐक, आपण सर्पाला दुखावला आहे. तोच त्याला ठेंचून टाकला असता ह्मणजे देशाची मुळींच भीति उरली नसती. परिमाणूंनीं आपला एकीकरण होण्याचा धर्म सोडून ते जरी एकमेकांपासून विभक्त होऊन द्यावापृथ्वीचा विध्वंस झाला तरी बेहत्तर आहे, पण असल्या भीतिनें गुरफटूनबसून अन्न खाण्यांत अर्थ नाहीं. निजतां–खातां–पितां–कोणचाही व्यवहार करतां–भीतिच–भीति ! काय तीं दुष्ट विक्राळ स्वप्नें ! सर्वांगाचा कसा थरकांप करून सोडतात. या जगांत असल्या त्रासदायक स्थितींत हालसोशींत बसण्यापेक्षां आपल्याला राज्यपद मिळाल्यावर सुख मिळेल ह्मणून ज्या आत्म्यांना आपण स्वर्गाला शाश्वत सुखांत धाडून दिलें आहे–त्यांच्याच जवळ जाऊन बसणें काय वाईट ? नातेवाईकांचा द्वेष, परचक्र, वीष, शत्रू वगैरे कोणच्या तऱ्हेची तरी महाराजानां आतां भीति उरली आहे का ? राजद्रोहानें त्यांचें जें काय व्हायचें तें एकदां

झालें. आतां काय. मलयपूरच्या ज्या छत्रीतल्या थडग्यांत त्यांची राख ठेविली आहे तिला पूर्वदेह प्राप्त होऊन पुन्हां कधीं तरी तो आतां सिंहासनाला स्पर्श करूं शकेल काय ? या नष्ट संसारातल्या विषमज्वराची पीडा भोगून आतां शांतवर्मा स्वस्थ आनंदांत सुखशयनीं घोरत पडला असेल.

**प्रलया०**—पुरे गडे आतां हे विचार. चलायचेंना ? आज रात्रींच्या मेजवानीला येणाऱ्या आपल्या सरदारांनीं जर ही आपली अशी मुद्रा बघितली तर त्यांच्या मनांत काय बरें येईल ? चला. आपलें मन शांत करून मुद्रा आनंदी करा.

**मालव०**—लाडके, त्यांत का मी चुकणार आहे ? तूंही पण चुकूं नकोहो ! वसंतरावाच्या तैनातींत कार्डीभर देखील कमीपणा होऊं देऊ नको ! बोलण्यांत, मुद्रेंत, आदरातिथ्यांत—त्याला असें वाटलें पाहिजे कीं, आपण त्याला अतीश्रेष्ठ पदाचा मान देऊन त्याचा मोठा गौरव करतो आहोंत! त्याची हांजी हांजी तर करायची, पण ती आपली पाहिरी राखून. एकंदर अशी चोख व्यवस्था ठेवतेस कीं, आपल्या मनांत काय चाललें आहे याचा लेश सुद्धां जमलेल्या मंडळीला कळतां उपयोग नाहीं !

**प्रलया०**—त्याबद्दल आपल्याला काळजी नको !

**मालव०**—वसंतराव आणि त्याचा मुलगा दत्ताजी जिवंत असल्यामुळें माझ्या मनाला आंतून कशा डागण्या लागल्या आहेत.

**प्रलया०**—मग ते अमरपट्टा का घेऊन आले आहेत ?

**मालव०**—नाहींत—ह्मणूनच जिवाला थोडेंसें समाधान वाटतें. पण त्याबद्दलही मोठी काळजी नाहीं. तूं स्वस्थ ऐस ! आज रात्रीं पाकोळ्या आपलीं घरटीं सोडून बाहेर घिरट्या घालूं लागायच्या पूर्वीं आणि रातकिडा ओरडून ओरडून मनुष्यानां झोंप आणायच्या पूर्वीं एक मोठें भयंकर कृत्य होणार आहे.

**प्रलया॰**—तें कोणचें ?

**मालव॰**—तें पार पडून त्याचा धन्यवाद ऐकू येण्याची वेळ येई तों, तें समजावून घेऊन आपलें मन कशाला उगीच पापी करून घेतेस ? हे कृष्णवस्त्र परिधान करणाऱ्या निशासुंदरी, ये–धांवत ये–आणि या दिवसाच्या दयार्द्रनयनाला आपल्या तिमिरपटानें गच्च आवळून टाक; आणि ज्याच्या भयानें मी असा वेडोबा बनत चाललों आहे त्याची आयुष्यपत्रिका आपल्या मायावी हातांनीं फाडून तिच्या चिंध्या करून टाक! सूर्याचा प्रकाश कमी होत चालला–कावळे आपल्या घरट्यांकडे धांव मारूं लागले–प्रकाशांत प्रफुल्ल होणाऱ्या वस्तु शिथिल होऊं लागल्या–यावरून रात्र आतां खचित आपला अम्मल या अर्ध गोलावर बसवणार! रात्रीचे दुष्ट सेवक आपल्या भक्ष्याकडे धांव मारण्यास याच वेळीं तयार होत असतील. कां, माझ्या बोलण्याचें तुला आश्चर्यसें वाटतें ? थोडा धीर धर. ज्या गोष्टीचा आरंभ वाईट साधनांनीं केला जातो–तिला पुष्टी येण्यालाही तसल्याच साधनांचा उपयोग करावा लागतो. चल–घरांत जाऊं. ( जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

राजवाड्या शेजारील उपवन—तीन मारेकरी.

**प॰ मारे॰**—पन कायर, आमाप येन्याला तुला कुनी सांगितलं ?

**ति॰ मारे॰**—सरकारानी न् दुसर कोन सांगतया.

**दु॰ मारे॰**—यो ज्ये काई सांगतोया त्येच्यात् अन् आपनास्नी ह्मराजांनी सांगितल्या त्येच्यात् अक्षी बराबर सांगाड जमतीया. तवा येच्यावर इसवास टाकून आपल्या डावामंदी येला घेन्याला काईबी हरकात न्हाई असं मला गम्तया !

**प०मारे**—ठीक हाये. येर मर्दा. आमच्याप असा रोखून ताठ–अक्षी शिपायावानी उभा -हा. त्यो पगा पच्छिमेकड अजून वाइच उजाड हाये. राव, धर्म शाळप जान्यापाई बाटसरू बिगी बिगी पाऊस उचालतात ती हीच येळ बरका. ज्या गिरस्ता करता आपून इक्ता येळ ये जागी दबा धरून बसलो हाओत त्यो आता इक्त्यामंदी यईल पगा.

**ति॰ मारे**—ऐकाराव, घोड्याच्या टापावानी चाऊल लागतीया. (पड्यांत–वसंत० -कोण आहेरे, मशाल आण इकडे. )

**दु॰ मारे॰**—अर त्योचर त्योच! ज्येना ज्येना म्हून सरकारवाड्यामंदी जायच व्हत त्ये सम्द मगाच ग्येल. येवरून मी झनतो कि त्योच हाये!

**प॰ मारे॰**—अर त्येंची घोडी कुठ हैती ?

**ति॰ मारे॰**—राजवाडा हतपून चराब निम्मा कोस हाये. योक मैलावर घोडा सोडूनश्यान ये बगीच्यापून समद्या सरदारानी पाईपाईच राजवाड्यांत जावं असा हुकूम है.

**दु॰ मारे॰**—अर उजाडपल्डा–उजाड !

( वसंतराव व त्याचा मुलगा मशालीसह येतात. )

**ति॰ मारे॰**—ह्योच राव ह्योच.

**दु॰ मारे॰**— मर्दा तयार -हा बरका.

**वसंत॰**—दत्ताजी, आज पाऊस पडणार असें वाटतें.

**प॰ मारे॰**—यो पल्डा पगा आताच! ( वसंतरावावर वार करून त्याला पाडतात. )

**वसंत॰**—अरे दगा, घात झाला. दताजी पळ–पळ. पळून गेलास तर या कृत्याचा सूड तरी घेशील. ( मरतो. )

**दत्ताजी॰**—यांत काय संशय ! ( जातो. )

**ति॰ मारे॰**—अर मशाल कोनी इझावली ?

**प॰ मारे॰**—मंगका वंगाळ झाल व्हय ?

**ति० मारे०**—अर हत तर योकच मरून पळ्डा हाये. अन येचा ल्योक फरारी झाला वाटतं ?

**दु० मारे०**—म्हजी, आपल आर्ध काम हुकल इचिभन.

**प० मारे०**—वर चला, झाल इक्ततर जाऊन सांगू सरकाराप. यो मुडदा द्या त्या खाड्यामंदी फ्येकून अन ढकला माती वर. ( तसें करीत असतां पडदा पडतो. )

---

## प्रवेश चवथा.

राजवड्यांतील दरबाराचा दिवाणखाना.

**मालवकेतू** व **प्रलयादेवी** सिंहासनावर वसलीं आहेत.
**रक्तपाल** व **केदारबा** वगैरे मंडळी योग्यस्थलीं
बसलीं आहेत.

**माल०**—सरदारहो, आमच्या बोलावण्याला मान देऊन आजचा समारंभ साजरा करायला आपण सर्वजण आलांत, या बद्दल आम्हांला फार आनंद झाला आहे.

**सरदार**—महाराजानीं आमचा एवढा आदरसत्कार केला याबद्दल आमच्यावर महाराजांचे उपकार आहेत.

**मालव०**—सामान्य जनाप्रमाणें मी आपल्या पंक्तीला जेवायला वसलों. गादीचा मान ठेवायचा तो आमच्या कुटुंबानें ठेवलाच व योग्य वेळीं त्यांनीं अतिथी सत्कारही केला.

**प्रलया०**—बोलावण्या प्रमाणें आपले सगळे स्नेही-सरदार आलेले पाहून मला मोठें समाधान झालें.

**मालव०**—हं चालू द्या. गाणें सुरू करा. जेवण झाल्यानंतर अम्मळ विश्रांती पाहिजे!

( नायकीणीची एक चीज संपून दुसरी अर्धी झाल्यावर एक
मारेकरी येतो, त्याच्याजवळ जाऊन ).

**मालव०**—अरे, तुझ्या तोंडावर रक्ताचे डाग आहेत.

**प० मा०**---त्ये वसंतरावांच्या रक्ताचे हायेत !

**मालव**०-हें रक्त त्याच्या शरीरांत राहण्या पेक्षां तुझ्याच तोंडावर असणें चांगलें ! केलीस एकदांची रवानगी ?

**प० मारे**०-जी सरकार. त्येचं नरडं ह्याच मर्दानं कापलं.

**मालव**०-शाबास ! आहेसच तूं तसा शूर गळेकाप्या. त्याच्या प्रमाणेंच दत्ताजीचा गळा ज्यानें कापला असेल तोही मोठा रणधीरच ह्मणायचा. आणि जर का दोघांचेही तूंच कापले असशील तर मग काय तुझ्या सारखा अद्वितीय पुरूष तूंच

**प० मारे**०-सांगाया शरम वाटती सरकार. दत्ताजी पळाला.

**मालव**-( आत्मगत ) काळजी---पुन्हां काळजी लागली. दत्ताजी जर मेला असता तर वैदुला सारखी गोल व अखंड, भूधराप्रमाणें दृढ व स्थीर आणि वायूप्रमाणें सर्वगामी व विस्तीर्ण अशी माझी सत्ता झाली असती. पण आतां काय. शंका आणि भय यांनीं मी जखडबंद होऊन माझ्या हातापायांच्या जुड्या झाल्या. मी सदां दुःखी बनलों. (उघड) पण कायरे, वसंतराव सुरक्षित आहेतनां ?

**प० मारे**०-जी सरकार. बाग पल्याडल्या खाड्यांत टाळक्यावर मोटाल्या ईस जखमा घेऊन सवास्त माती पांघरून पल्ड हैत.

**मालव**०-ठीक आहे. तूं जा आतां. पुन्हां उद्यां सर्व हकीगत सांगायला ये. ( जातो. ) थोरला भुजंग तर चीत होऊन पडलाच. पण त्याचा बच्चा पळून गेला हें मोठें वाईट झालें. त्याला जरी अजून दांत फुटले नाहींत तरी, त्या प्राण्याचा स्वभाव असा आहे कीं, त्या पासून विषारी वीण उत्पन्न व्हायचीच.

**प्रलया**०-( मालवकेतूच्या जवळ जाऊन ) आपल्या घरीं बोलावलेल्या चार मंडळीशीं बोलायचें सोडून इकडे काय चाललें आहे ? पान सुपारी होऊन किती वेळ झाला. आपण जागेवर

येऊन बसल्या शिवाय पुन्हां गाणें सुरू होत नाहीं. मंडळी पहा कशी तटस्थ बसली आहे.

**मालव०**—हो खरेंच. गाणें सुरू करा. अन्नपचन चांगलें व्हायला भूक उतम लागावी लागते; श्रम झाले कीं भूक लागलीच पाहिजे. अन्नपचन चांगलें झालें म्हणजे प्रकृति सुदृढ होते. इतक्या लांब येण्याचें तुह्मीं श्रम घेतलेत याबद्दल माफी करा. ( वसंतरावाचें भूत येतें आणि मालवकेतूच्या जागीं बसतें. ) आजच्या थाटाला वसंतरावांचीं स्वारी आली असती म्हणजे राज्यांतले मोठमोठे मानकरी, इनामदार लोक या ठिकाणीं आले आहेत असें म्हणायला हरकत नव्हती. ते उगीच आले नाहींत असें नाहीं. ते मुद्दाम आले नसावेत !

**रक्तपाल**—मी खात्रीनें येईन असें त्यानीं मला सांगितलें होतें. आले नाहींत हा त्यांचाच दोष. आपण जागेवर बसून गाणें सुरू करायला परवानगी द्यावी असें मला वाटतें.

**मालव०**—मी कोणच्या जागेवर बसूं ?

**केदार०**—सिंहासनावर सरकार.

**मालव०**—नाहीं. तिथें तर तो बसला आहे.

**केदार०**—तो कोण ? तें आह्मां सर्वांना रिकामें दिसत असून महाराजानांच कसें भरलेलें दिसतें ?

**मालव०**—हें कृत्य कुणी केलें ?

**सरदार**—कोणचें सरकार ?

**मालव०**—हं खबरदार ! मालवकेतूनें हें केलें असें तुझ्यानें कधीं म्हणवणार नाहीं. तें तुझें रक्तानें भरलेलें डोकें माझ्याकडे पाहून हालवूं नको !

**रक्तपाल**—चला मित्र हो उठा ! महाराजांची प्रकृती बिघडली—अशा वेळीं गाणेंबिणें कांहीं उपयोगी नाहीं.

**प्रलया०**—आपण सगळ्यांनीं बसावें. स्वारीला कधीं कधीं असें होत असतें. हा रोग लहानपणापासूनच जडलेला आहे

ही लहर क्षणिक असते. इकडल्या मुद्रेकडे आपण अगदीं बघूं नका. नाहींतर संतापानें शुद्धीवर येण्याला फार वेळ लागेल ( मालवकेतूस ) अंगांत कांहीं धैर्य आहे का ?

**मालव०**—यांत काय संशय! ज्या वस्तू पाहून माणसें गर्भगळीत होतील अशांशीं सुद्धां साम्ना करण्याचें माझ्या अंगीं धैर्य आहे.

**प्रलया**—तर मग इतकें धैर्य असतां असें काय करायचें? आपल्याला जें दिसतें आहे तें खरें नाहीं! मागें आपल्याला एकदां हवेंत कट्यार दिसली होती, त्यांतल्याच या भीती-च्या नि कल्पनेच्या बाधेच्या छाया आहेत. हिवाळ्यामधल्या शेगडीशीं शेकत गोष्टी सांगत बसणाऱ्या बायकांनीं असल्या गोष्टी सांगाव्या–नि, त्यांतल्या आडवा पदर घेतलेल्या म्हाताऱ्या आजीबाईनें ' ह्या सगळ्या गोष्टी खऱ्याच हो ' म्हणून मान डोलवून सांगावें. त्यांना हें शोभतें. कांहीं तरी मेली लाज असूं द्या! सिंहासनाकडे पाहून अशी वेडी वाकडी काय तोंडें करता ?

**मालव०**—तें–पहा, लक्ष–दे, डोळे–लाव. नुसती मान हालवतोस नि बोलायला काय झालें? भारलेल्या जागांतून आणि थडग्यांतून मुखावरच्या प्रचंड शिला बाजूला झुगारून देऊन पिशाच्चें व प्रेतें जर बाहेर येऊं लागलीं, तर मग त्यानां तेथें ठेवण्यापेक्षां कोल्ह्याकुत्र्यानां किंवा गिधाडांनां तीं देऊन टाकली तर काय वाईट ? ( भूत जातें. )

**प्रलया०**—मूर्खपणानें अगदींच मनुष्यस्थिती टाकणें चां-गलें नाहीं ! कांहीं तरी ताळ हवा !

**मालव०**—मी इथें उभा आहे याबद्दल जशी तुझी खात्री आहे, त्याचप्रमाणें, तो माझ्या दृष्टीस पडल्याबद्दल माझी खात्री आहे ?

**प्रलया०**—आग लागो त्या तुमच्या निर्लज्जपणाला !

**मालव०**--पूर्वयुगांत खून होत नव्हते असें नाहीं. त्या काळीं सुद्धां असे भयंकर खून झाले आहेत कीं, त्यांचें वर्णन कानांनीं ऐकवत सुद्धां नाहीं. पण त्या काळीं येवढें एक सुख होतें कीं, एखाद्या मनुष्याच्या डोक्याच्या चिंधड्या जर झाल्या तर तो मरायचाच. पण सध्यां तर खून झाला कीं तो पुन्हां जिवंत होतो आणि दुसऱ्याची जागा बळकावून बसतो. खून करणें हें कांहीं मोठें विलक्षण नाहीं, पण खून झालेला प्राणी पुन्हां जिवंत होणें हें मोठें आश्चर्य आहे !

**प्रलया०**-सरदार मंडळी आपली वाट पहाते आहे. चला-यचेंना जागेर बसायला ?

**मालव०**—अरे हो, अगदींच विसरलों. सरदारहो, माफ करा अं. या माझ्या स्थितीबद्दल ज्याला ह्मणून माहीती आहे त्याला याबद्दल कांहींच नवल वाटणार नाहीं. हं चालू द्या. गाणें सुरू करा. आमचे दोस्त वसंतराव आज आले असते तर काय बहार झाली असती. न येवोत, त्यांची मर्जी. ( भूत येतें. ) अरे हा पुन्हां आला. जा—चल—निघ माझ्या पुढून. हे माते वसुंधरे, या रक्तमांसविरहित अस्तीचर्मपुतळ्याला आ-पल्या उदरांत कोंडून ठेव ! तूं—माझ्याकडे, त्या तुझ्या निस्तेज डोळ्यांनीं टवकारून पाहूं नको !

**प्रलया०**—सरदार हो, हा प्रकार नेहमींचाच आहे. या-मुळें सध्यांच्या वेळीं आनंदाची राड झाली—पण त्याला उपाय नाहीं !

**मालव०** – मनुष्याची सगळीं कामें करायला मी एकटा तयार आहे- सध्यांचें रूप टाकून उत्तर ध्रुवाकडल्या वर्फांतला क्रूर अस्वल, लांब शिंगाचा मोठा गेंडा किंवा मोठ्या पट्ट्यांचा जंगी वाघ यां पैकीं वाटेल तें रूप धरून ये; आणि मग मी भीतों का पहा ? पाहिजे तर पुन्हां पूर्वीं सारखा जिवंत होऊन हातांत समशेर धरून माझ्या शौर्यगुणाला कसोटी लावायला

तयार हो- मग जर मी घरांत दडून बसने, तर–मग मात्र मी भागूबाई आहे, असा माझ्या नांवाचा जगभर डांगोरा पीट. काय ही भयंकर विक्राळ छाया! जा तूं एथून. हे मिथ्या भासा, हो नाहींसा. ( भूत जातें. ) काय गेला तो? वा: तो गेल्या बरोबर पुन्हां मी मानवी स्थितीवर आलों. मित्रहो, स्वस्थ बसा. हं करा गाणें सुरू.

**प्रलया०**––आपल्या या स्थितीनें आजच्या समारंभाची माती झाली.

**मालव०**––अशा गोष्टी कधीं घडतात काय? वसंतरुतू-मधलें स्वच्छ आकाश ज्याप्रमाणें मेघ एकदम व्यापून टाकतात त्याचप्रमाणें, असल्या गोष्टी जर अकस्मात घडून येतात तर त्याबद्दल एकाला आश्चर्य व दुसऱ्याला तें माहीत सुद्धां असू नये काय? आतांची असुरी वस्तु पाहून मी मात्र भयानें व्याकूळ व्हावें आणि तुमच्या गालांवरचे ते सतेज गुलाबी छटे मुळींच फिकट पडूं नयेत––मोठा चमत्कार आहे!

**रक्तपाल**—सरकार, आपण कोणची असुरी वस्तु ह्मणतां?

**प्रलया०**—कृपा करून आपण कोणी कांहीं एक बोलूं नये. इकडची प्रकृती अधिक बिघडत चालली आहे. आपण आतां सगळे एकामागून एक चला. प्रश्नांनीं संताप जास्त होईल. चला–चालूं लागा.

**केदार०**––बरें आहे येतों आह्मीं. (प्रलयादेवी व मालवकेतू यांशिवाय सर्व जातात )

**मालव०**––असें झाल्याशिवाय सोयच नाहीं. खूनासखून पडलाच पाहिजे. असें ह्मणतात कीं खुनी माणस सप्तपाताळां-तल्या गुहेंत जरी जाऊन बसला तरी त्याच्या विरुद्ध दगड साक्ष देतात; झाडांनां वाचा फुटून तीं त्याचा पत्ता सांगतात; आणि कार्यकारण सांगणारे पंचाक्षरी, मांत्रीक त्याला पाहिजे तथून खेंचून बाहेर काढतात. किती रात्र झाली असेल बरें आतां?

**प्रलया०**—अगदीं पहांटेची वेळ झाली–उजाडायला झालें झटलें तरी चालेल.

**मालव०**–जयाजीरावांना बोलावलें असून ते आले नाहींत याबद्दल तुझा काय तर्क चालतो ?

**प्रलया०**—आपण स्वत: बोलावणें पाठवलें होतें का ?

**मालव०**—नाहीं; पण कर्णोपकर्णी त्यांचा न येण्याचा बेत मी ऐकला आहे! आतां एकदां मी स्वत: त्यांना बोलावणार आहे. आपल्या राज्यांतल्या सर्व सरदारांच्या घरीं माझा पगार खाऊन एकेक हेर मी ठेवला असल्यामुळें या अशा वातम्या मला ताबडतोब कळतात. असो; आतां उद्यां लवकरच मी त्या डाकिणींच्या गुहेंत जाऊन त्यांच्याकडून अधिक कांहीं गोष्टी समजावून घेणार आहे. अती वाईट गोष्टी समजावून घेण्यास अती नीच साधनांचा जरी उपयोग करावा लागला तरी तो करायचा असा मी निश्चय केला आहे. आजपर्यंत खून करून त्यांच्या रक्तमांसाच्या चिखलांत मी इतका दूर चालून गेलों आहे कीं, इत:पर कांहींएक करायचें नाहीं असा निश्चय करून जर मागें येऊं लागलों तर, पुढें जाणें जितकें कंटाळवाणें होणार आहे तितकेंच मागें येणें गलिच्छ वाटणार आहे. माझ्या डोक्यांत ज्या कांहीं विलक्षण कल्पना आल्या आहेत त्यांचा उच्चार करण्याच्या अगोदर जर त्या हातीं घेऊन पार पाडल्या तर उत्तम होणार आहे.

**प्रलया०**—चला. क्षणभर डोळा लागला ह्मणजे डोकें शांत होईल.

**मालव०**—चल जाऊन निजूं. माझें मन जें आंतल्या आंत खात आहे तें एकदां निरढावून निगरगट्ट झालें ह्मणजे झालें. असलीं कृत्यें करण्यांत अजून आपण नवीनच आहोंत ह्मणून आपली अशी भ्रांतिष्टासारखी स्थिति होते; दुसरें काय. चल. ( जातात. )

---

## प्रवेश पांचवा.

भयाण रान. मेघगर्जना. **अहितकर्मी, मानमोडी, ऊरफोडी व बरगडतोडी** येतात.

**मान०**—कां अहितकर्मीबाई, आज तुह्मीं रागावल्यासारख्या दिसतां ?

**अहित०**—कां गाहीं रागावणार ! 'आह्मीं मालवकेतूच्या नशीबाशीं भातुकली खेळून त्याच्या जिवाचा चट्टामट्टा करून टाकतों' ह्मणून कबूल केलेंत त्याला कितीग दिवस लावले आहेत ? पांच महिने होत आले. कायग बरगडतोडे, ऊरफोडे, मानमोडे, आतां कां बोलानात ? दांडग्यान् धिटकुल्या कुठल्या !

**बरगड०**—बोलायचें काय ? आतां आह्मीं आपली भातुकली लवकरच आटपणार आहोंत.

**अहित०**—बरं तर, आटपा लवकर. आपल्या नशीबीं पुढें काय आहे तें समजावून घेण्याकरितां तो उद्यां सकाळीं नर्कखाड्यापाशीं येणार आहे. तर त्यावेळीं सगळी तयारी करून ठेवा. मी आतां जाते. तो पहा चंद्राच्या कोरीवर एक पाण्याचा थेंब लोंबतो आहे. तो खालीं पडायच्या अगोदर मी वरच्यावर त्याला झेलून जादूच्या करामतीनें शुद्ध करते आणि त्यापासून कृत्रिम भुतें तयार करते. तीं मालवकेवूला आपल्या मोहजालानें नाशवन्हीकडे फरफर ओढीत नेतील नि तुमची भातुकली चट्कन आटपेल.

**मान०**—आम्हांला तरी तेंच पाहिजे होतें.

**ऊर०**—भातुकली कशी पुरी करावी हें आह्मांला कळत नव्हतें.

**बरगड०**—अन् तुमच्याशिवाय ती शेवटाला जाणें कठीणच होतें.

**अहित०**—बरें तर जाते मी आतां. तो पहा त्या ढगावर माझा लाडका चिमुकला प्राण माझी वाट पहातो आहे. (जाते.)

**मान०**—चला, लवकर आटपलें पाहिजे.

( गात नाचत जातात. )

---

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

नर्कखाड्यापासली गुहा–गुहेच्या मध्यभागीं एका कढयींत पाक खदखदतो आहे व तो **मानमोडी–ऊरफोडी–** व **बरगडतोडी**–ढवळीत बसल्या आहेत.

**मानमोडी**–बांडें मांजर भलें, त्यानें तीनदां म्यॉं म्यॉं केलें!

**ऊरफोडी**–काळें डुक्कर भलें, तें चार वेळां डुरकलें!

**बरगडतोडी**–हडळ ह्मणते झाली वेळ, चला सख्यानों धरा मेळ!

**मानमोडी**–रांध्याच्या भोंवतीं फेर धरूं, विषारि आंतड्यांत बेडुक भरूं! रात्री तीस दिवस एक, दिवस तीस रात्र एक! पांथळ जागीं दगडामधीं, दडून बसतो थंडी मधीं! वीष एशा बेडकाचें, काढलें निजून ह्मणी साचें! मोहनी वर्धक रांध्यामधीं, टाका लवकर बेडुक अधीं!

**तिघी**–दुणावलि दगदग, दुणावलि कटकट ॥
जळे अग्नि धगधग, करि भांडें रटरट ॥

**ऊरफोडी**—अचरट अती सापाचें पोर, घारीचा डोळा काळाभोर। वडवागळाचा केस एक, बेडूक याचें बोट एक। दाता सकट तोंडाचि साय, मण्यारिसापाच्या, पालीचा पाय।

कुत्र्याचि जीभ, घुवडाचे पंख, अंधळा काळा विंचू डंख। करितों ज्यानें ऐशी नांगी, इतकें सगळें घेवोनी। मोहकपात्रीं घालोनी, शिजवा तुह्मीं अतां ह्मणों। उत्तम होइल त्रास जनीं, भातुकलि आपली करोनी। बुड्बुडे येती नर्ककुंडा, तैसे येती आपुल्या भांड्या।

**तिघी**—दुणावलि दगदग, दुणावलि कटकट॥
जळे अग्नि धगधग। करिभांडें रट्रट्॥

**बरगडतोंडी**—मांजराचा खवला, लांडग्याचा दात। तुर्काचें नाक, बोकडाचें पित्त। मसालाभरीव चेटकिचें प्रेत, कण्हेरिची मुळी अंधळ्यागात्रींत। आण खणून गात गीत। पाखंडि लुच्या अती नष्ट, नतद्रष्ट तैसा अती भ्रष्ट। काळिज त्याचें चंद्रग्रहणांत, बचनाग कांड्या ताज्या सात। नखानें मारी उपजत पोर, ऐशी माता बहू थोर। बोट ऐशा बालकाचें, घेउन इतुके पदार्थ साचे। करूं रांधा आपूण तयार, घट्ट चिकट पेज फार। तयार रांधा झाल्यावर, व्याघ्र आतडीं झट्कर। टाकूं, ह्मणजे तयार होई , रसायन आपुलें सिद्ध होईल !

**तिघी**—दुणावलि दगदग, दुणावलि कटकट॥
जळे अग्नि धग धग, करिभांडें रटरट॥

**ऊरफोडी**—ताजें रक्त माकडाचें, शिंपडूं त्यावर बहू साचे॥
ह्मणजे होइल बहूथंड, रसायन उत्तम बहूथंड॥

( अहितकर्मा येते )

**अहित०**—शाबास–माझ्या शिष्यिणीनों–शाबास ! तुमच्यावर मी आज सुप्रसन्न झालें आहे ! तुमच्या भातुकलीच्या खेळांतल्या या शेवटच्या, नर्ककुंडांतल्या, अत्तराची बरोबरी करणाऱ्या पाकांनें तुह्मीं ज्या मालवकेतुच्या जिवाचा चट्टामट्टा करणार आहांत तो झाला ह्मणजे मग दुसरी भातुकली खेळायला मी तुह्मांला परवानगी देईन ! चला या–आपण फेर धरून गाणें

गाऊं आणखी या पाकांत मोहनी आणूं. ( गाणें संपल्यावर अहितकर्मी जाते. )

**ऊर०**—माझा आंगठा खाजतो आहे यावरून कुणीतरी घातकी पुरूष इकडे येतो आहे असें वाटतें. ( मालवकेतू येतो. )

**मालव०**—कसेंकाय–कृष्णकर्मी–निशाचर–आडमार्गी डाखिणीनों, काय चाललें आहे ?

**तिघी**—निनांवी कृष्णकर्म.

**मालव०**—प्रश्नांची उत्तरें तुम्हांला कशीकाय समजतात याची चौकशी करायला मी इथें आलों नाहीं—तर मी विचारतो तेवढ्यांचीं उत्तरें मला द्या. न द्याल तर तुह्मांला तुमच्या इलमाची शपथ आहे ! सर्व प्रकारचे वारे एकदम सुटून मोठाले पर्वत उमळून पडले, सप्तसमुद्रांना शेवटची भरती येऊन त्यांनीं सर्व जमीन गिळून टाकण्याचा प्रयत्न केला किंवा मोठाले राजवाडे अथवा उंच मनोरे यांनीं आपलीं गगनचुंबीत मस्तकें धरणीकंपानें जमीनीवर टेकली–फारतरकाय–प्रत्यक्ष नाशाधिपतीला सुद्धां ओकारी येईपर्यंत पृथ्वीवरच्या सर्व वस्तूंचा विध्वंस झाला तरी देखील हा मर्द कशालाही भिणार नाहीं. मुकाट्यानें माझ्या प्रश्नांची उत्तरें द्या !

**मान०**—बोल ?

**ऊर०**—कायतेंमाग ?

**बरगड०**—आह्मीं उत्तरें देण्याला तयार आहोंत.

**मान०**—पण–आमच्या खेळगड्यांच्या तोंडून ऐकायचें आहे–किं, आमच्या–आधीं सांग ?

**मालव०**—बोलवा, त्यानां मला पाह्यचें आहे.

**ऊर०**—गळफास घालून प्राण घेतलेल्या खूनी मनुष्याची चरबी विस्तवावर टाकून, जिनें नऊ पोरांची वीण खाऊन टाकली आहे अशा डुकरीणीचें रक्त शिंपडा ( शिंपडतात. )

**तिघी०**--आपापलीं कामें मोठ्या हुशारीनें करण्याकरतां लहान, मोठे कोण असाल ते लवकर या ?

( मेघगर्जनाहोऊन-कढईतून एक छाया वर येते. )

**मालव०**—हे अज्ञान देवते, मला सांग कीं:—

**मान०**—थांव. तुझे सगळे विचार त्याला माहीत आहेत. फक्त तो काय बोलतो तेवढें ऐक.

**प०छाया**—मालवकेतू, पुष्पपुरीचा सरदार जो जयाजी-राव त्याच्याबद्दल सावध ऐस. वस्स, पुरे-मी जातो.

**मालव०**--तूं कुणीही ऐस-विण्याच्या तारेप्रमाणें जी भीती मला चिकटलेली आहे असें वाटत होतें तिच्याबद्दल तूं मला अगाऊ सूचना दिलीस याबद्दल मी तुझा फार अभारी आहे. पण आणखी एक शब्द:—( प. छा. जाते. )

**ऊर** --सांगम्हणून ह्मणण्यानें तो अधीक कांहींएक सांगणार नाहीं ही पहा दुसरी जबरदस्त स्वारी आली.

( मेघगर्जना होऊन दुसरी छाया-सर्वांग रक्तानें भरलेलें एक पोर कढईतून वर येतें. )

**दु०छाया**—क्रूर, शूर व दृढनिश्चयी हो. योनिजांपासून तुला अपाय होणार नाहीं. बेलाशक त्यांचा उपमर्द करून धि:कार कर. ( दु. छा. जाते. )

**मालव०**—ठीक आहे. जयाजीराव, आतां आपण खुशाल जिवंत रहा. मला तुझी लवमात्र भीति नाहीं. पण-हो-प्रथम-धनको जसा रिणकोपासून करार मदार लिहून घेतो तसेच आपल्याला आपल्या नशीवा पासून करून घेतलें पाहिजेत. एकेरी खात्रीला दुहेरी केली पाहिजे. जयाजीरावाला एकदां उडवल्यावर मग मी या हृद्रोगी भीतिला खोटी ठरवून, बाहेर मोठी झुंज चालली असतांही आपल्या महालांत स्वस्थ घोरत पडेन. ( मेघगर्जना होऊन-तिसरी छाया-एका मुलाच्या रूपानें मुगूट घालून हातांत एक झाड धरून कढईतून वर येते.)

सर्वांत श्रेष्ट पदवीचा मुगूट आपल्या चिमुकल्या डोक्यावर घालून हें राजपिंडें मूल कोणाचें आलें—कायग हें ?

**बरगड०**—ऐक—कांहींएक बोलूंनको.

**ति०छाया**—सिंहा सारखा शूर व निधड्या छातीचा होऊन नेहमीं सर्वांशीं ताठ्यानें वागत जा. तुझें वैभव पाहून कोणीहीं बोटें मोडो, तूं तक्तावर बसलेला पाहून कोणीही कपाळाला आठ्या घालो किंवा कशाही व कोणीही तुझ्या विरूद्ध मसलती करो—त्यांची तूं पर्वा करूं नको. जोंपर्यंत वराहारण्य त्रिशूल दुर्गापर्यंत चालून येणार नाहीं तों पर्यंत कोणीहीं तुझ्याशीं, सामना करूं शकणार नाहीं. ( ति० छा० जाते. )

**मालव०**—रानाला पाय फुटून तें जसें आपोआप चालूं लागणें अशक्य आहे, तसेंच मला मृत्यू येणेंहीं अशक्यच ठरतें ! पृथ्वींत गढून गेलेली मुळें उपटून काढून त्यांना चलन शक्ती देणार सध्यां कोण ईश्वरी अवतार उत्पन्न झाला आहे ! वाहवा, किती गोड मधूर ही भविष्यें आहेत. नाहीं पण अजून एक गोष्ट समजून घ्यायची राहिली आहे. हें राज्य माझ्या मागून वसंतरावाच्या मुलानां मिळणार किंवा दुसरें कोणाला मिळणार हें जर तुह्मी मला इतर भाकीता प्रमाणें कळवलेंत तर माझ्यावर मोठे उपकार होतील?

**तिघो**—संपलें अधीक कांहीं विचारायचें नाहीं ?

**मालव**—नाहीं—अधीक कांहीं नाहीं. वसंतरावाच्या मुलांना हें राज्यपद मिळणार नाहीं असें सांगा—ह्मणचे संपलें. मग तुह्मीं चिरकाल आपल्या नर्ककुंडांत जाऊन स्वस्थ सुखानें नांदा. अं अरेपण हें काय ? ही तुमची अद्भुत खढई नाहींशी काय व्हायला लागली—अन् हा एवढा आवाज कसला?

**तिघी**—मालवकेतू डोळे ताठ, करूनी पाहा राजे आठ ॥
यावें तुह्मीं छायानों, जावें झणीं बायांनों ॥
राजबाळें चिमुकली दावुन सपवूं भातुकली ॥

( राजवेषधारी आठ भुतें–शेवटल्याच्या हातांत आरसा व मागून वसंतरावाचें भूत येतें. )

**मालव०**—तूं अगदीं वसंतरावा सारखा आहेस. जा–नाहींसा हो! तुझ्या डोक्यावरचा मुगूट पाहून माझी बुबुळें बाहेर लोंबूं लागली–अं एक दोन–हें तिसरें. अरे हीं सगळीं एकसारखीं आहेत–वाहवा–हें–चवथें–ए डाकिणीनो, हें काय हें तुह्मीं मला दाखवता आहांत. अं हें पांचवें. हे चक्षुरिंद्रियानों, तुह्मीं आपला धर्म सोडून मृत कां होत नाहीं? असला संताप कारक देखावा बघण्या पेक्षां मी अंध झालों तरी बेहत्तर आहे. आहे तरी काय हें? पांच–सहा–सात–प्रलयकालपर्यंत हा वंश राज्य करणार कीं काय? बस्स, मी अधीक पाहणार नाहीं. अरेच्या आतां काय करावें हें आठवें दिसूं लागलें–याच्या हातांत तर एक आरसा असून त्यांत कित्येकांची प्रतिबिंबें दिसताहेत. त्यांत कित्येकांना दोन दोन सिंहासनें असून तीन तीन राजदंड आहेत. हरहर! काय विक्राळ अशुभ दर्शन हें! अरे हा पहा वसंतराव आला. अगदीं तोच. रक्तानें चिकटी येऊन याचे केस पहा कसे झाले आहेत. काय–माझ्याकडे पाहून–हंसून–माझा धिःकार करून–त्या गेलेल्या छायांकडे बोट दाखवून–ही संतती माझी आहे असें ह्मणतोस? अरे चोरा. काय ग ए डाखिणीनों, हें सर्व अगदीं निःपक्षपातानें असेंच घडून येणार कीं काय? ( भुतें नाहींशीं होतात. )

**मान०**—अगदीं अस्सें घडणार. ऊरफोडे, बरगडतोडे, या. आपल्या मंजुळ गाण्यानें व मोहक नाचानें मालवकेतूचें भयानें उदास झालेलें मन आनंदी करूं. वाऱ्यावर मोहनी घालून मी उत्तम भोंकन् सूर उत्पन्न करते अँ.

( गात नाचत डाकिणी नाहींशा होतात. )

**मालव०**–काय, त्या एकदम नाहींशा झाल्या? गेल्या कुठे? आजची तीथ मोठी भयंकर असून यावच्चंद्रदिवाकरौ शाप–

दग्ध आहे असेंच पंचांगांत लिहून ठेवलें पाहिजे ! कोण आहे बाहेर केदारजी ? ( केदारजी येतो. )

**केदारजी**०–काय आज्ञा आहे ?

**मालव**०–त्या डाकिणी इकडून गेलेल्या पाहिल्यास ?

**केदारजी**०–नाहीं सरकार.

**मालव**०–जाऊं देत. जे कोणी त्यांच्यावर विश्वास ठेवतील त्यांची राख रांगोळी होऊन ज्या दिशेकडून त्या गेल्या असतील तिकडची हवा नासून दुर्गंधी सुटो. बरें काय हो, मघांशी मी घोड्यांच्या टापा ऐकल्या असें मला वाटतें ! कोणी स्वारबीर आले आहेत कीं काय ?

**केदारजी**०––जयाजीराव दत्ताजीसह रक्तभुवनाला पळून गेल्याची खबर सांगण्याकरतां बाहेर स्वार आले आहेत.

**मालव**०––( आत्मगत ) अरेरे ! इकडच्या नादांत गुंग होऊन अती वेळ गेल्यामुळें जें भयंकर काम करायचें होतें तें व्यर्थ फसलें. पळून जाणाऱ्याचा तावडतोब पाठलाग केला तरच तो सांपडतो. बस्स–आजपासून हाच निश्चय. कोणचेंही काम मनांत येण्याचा अवकाश किं तें उरकलेंच. डोक्यांत कल्पना आली कीं ती पार पाडलीच. आतां प्रथम जयाजीच्या पुष्पपुरीच्या किल्यावर छापा घालून तो हस्तगत करून घ्यायचा. नंतर त्याची जहागीर जप्त करून त्याच्या बायका–पोरांनां, चाकर–माणसांना, त्याच्या–नातेवाईकांना–सर्वांनां एकदम ठार करायचें. गंगा वाहते आहे तों हात धुवून घ्यावे. अल्लड पोरांसारख्या फुशारक्या मारण्यांत अर्थ काय ? आतां पुन्हां ह्मणून या सठव्या डाकिणींचें मुखावलोकन करायचें नाहीं. (उघड) चला केदारजी, त्या स्वारांच्याकडे चला.

( जातात )

---

## प्रवेश दुसरा.

पुष्पपुरींतील—**जयाजी**च्या किल्यांतील एक खोली.
**चंद्रा,** तिचा मुलगा व **रक्तपाल.**

**चंद्रा०**—देशत्याग करण्या इतका मोठा अपराध तरी तिकडल्या हाबून काय झाला होता ?

**रक्तपाल०**—चंद्रा वहिनी, सर्व कांहीं सुरळीत होईल. अपराध कसलान् काय कसलें ? कांहीं दिवस धीर धरा ह्मणजे झालें.

**चंद्रा०**—तीळभर सुद्धां वाईट आचरण न करतां उगचि पळून जायचें झालें हा वेडेपणाच नाहीं का ? राजद्रोहासारखी जरी आपली कृती नसली तरी भीती–ती तशी आहे असें वाटायला लावते. हा मेला सगळा भीतिचा खेळ आहे.

**रक्तपाल०**—देशत्याग करण्यांत कांहीं मतलब आहे किंवा भीतिनेंच ते निघून गेले याबद्दल सध्यां तुह्मांला कांहीं एक कळायचें नाहीं.

**चंद्रा०**—छेग बाई–मी अगदीं वेडी खुळीच आहे ना ? पळून जायचें होतें तर आपली बायकामुलें बरोबर न्यायची होती. काय पण हें कर्त्यासवर्त्यांचें शहाणपण. भिकारडी टिटवी सुद्धां, तिच्यावर एखाद्या घुबडानें झडप मारली तर आपल्या घरव्यांत बसून आपल्या पिल्लांचें रक्षण करते. तें कांहीं नाहीं. आमच्यावरचें तिकडचें प्रेम नुसतें वरकर्णी आहे. ही सगळी भीति–नि ह्मणूनच पळून जायचें झालें.

**रक्तपाल०**—चंद्रावहिनी, फार काय सांगूं–वादळांनीं खवळलेल्या समुद्रांतल्या जहाजासारखी आमची स्थिती झाली आहे. कृपा करून जयाजीरावांबद्दल कोणच्याही तऱ्हेचे कुतर्क मनांत आणूं नका. नीट विचार करून घ्या. ते मोठे न्यायी, उदार व शहाणे असून सध्यां प्रसंग कोणच्या तऱ्हेचा आला आहे हें ते पक्कें जाणताहेत; व त्याप्रमाणेंच त्यांनीं

वर्तन केलें आहे. या पेक्षां अधीक मी कांहीं सांगत नाहीं. ज्या गोष्टींना आह्मीं भ्यायलें पाहिजे त्याबद्दलच आह्मीं वाटेल त्या गप्पांवर विश्वास ठेवतो–पण कोणच्या गोष्टींना आह्मीं भितो हें मात्र आमचें आह्मांलाच कळत नाहीं. आह्मीं राजद्रोही ठरतो पण ते कसे याचा आमचा आह्मांला मुळींच उलगडा होत नाहीं. बरें आहे. मी पुन्हां लवकरच परत भेटीला येईन. सध्यां प्रसंग जरी वाईट आहे तरी त्याचा शेवट दोन तऱ्हांनीं होणार आहे. एक सर्व नाश तरी होईल किंवा सुदैवानें पूर्वस्थिती तरी प्राप्त होईल. बरें आहे आमचे छोटे रावसाहेब, ईश्वर आपलें कल्याण करो. येतों मी आतां. राम, राम. ( जातो. )

**चंद्रा**०—आईबाप जिवंत असून तोंडावर पोरक्या पोराची कळा येणें ह्मणजे दुश्चिन्हच. बाळा, ते तर गेले. आतां तूं काय करशील नि तुझें कसें होईल याची मला मोठी काळजी लागली आहे.

**मुलगा**०—रानांतली पाखरें काय करतात ग आई ?

**चंद्रा**०—आळया, किडे, जें त्याना मिळेल तें खाऊन तीं आपलीं पोटें भरतात.

**मुलगा**०—मग मी त्यांच्यासारखेंच आयुष्य कंठीन.

**चंद्रा**०—तें खरें. पण या जगांतलीं जाळीं, गोंद, खाचा, खड्डे, चोर, बंध, गळ तुला माहीत आहेत का ?

**मुलगा**०—करायचें आहे काय माहीत असून ? त्या वस्तू कांहीं पांखरांच्यासाठीं नसतात. पण कायग आई, तुझ्या सगळ्या बोलण्यावरून बाबा कांहीं मेलें नाहींत असें मला वाटतें ?

**चंद्रा**०—अरे तें जरी खरें आहे तरी आपल्याला एखादें माणूस सोडून गेलें ह्मणजे जन्माचेंच अंतरलें नाहीं का ?

**मुलगा**०—आई, पण बाबा काग आपल्याला सोडून गेले ?

**चंद्रा०**—बाळा तिकडल्या नांवावर राजद्रोहाचा डाग लागला आहे.

**मुलगा०**—द्रोह ह्मणजे कायग आई?

**चंद्रा०**—एखादी गोष्ट करीन ह्मणून शपथ घेऊन तिच्या उलट वागलें ह्मणजे त्याला द्रोह असें ह्मणतात.

**मुलगा०**—मग जे द्रोही ठरतात त्या सगळ्यांनाच सुळावर चढावें लागतें ना?

**चंद्रा०**—हो सगळ्यांनां.

**मुलगा०**—अन् मग त्यांना ग कोण चढवणार?

**चंद्रा०**—राजद्रोह न करणारे प्रामाणिक.

**मुलगा०**—तर मग खोटें बोलणारे व शपथा वाहणारे, दोघेही गाढवच ह्मणायचे? कारण शपथा वाहून त्या मोडणाऱ्यांचा सध्यां इतका सुकाळ झाला आहे कीं, ते सुशील प्रामाणिक माणसांना सुळावर चढवतात?

**चंद्रा०**—काय मेलें माझें चिंगुडें लिब लिब बोलताहे तरी. पण बाळा, बापाशिवाय तुझें कसेंरे होईल?

**मुलगा०**—हो कांहींतरी बोलतेस. बाबा जर मेले असते तर त्यांच्याकरतां रडून रडून तूं आकांत केला असतास. ज्या अर्थी तूं रडत नाहींस तेव्हां बाबा लवकरच परत येतील असें मला वाटतें. न रडणें हा चांगला शकुन आहे.

**चंद्रा०**—याच्या या किलबिल्या बोलण्यानें मनांत कळवळा येतो.

(एक जासूद येतो.)

**जासूद०**—( मुजरा करून ) ईश्वर आपलें कल्याण करो. बाईसाहेब, मी आपल्याला ओळखतों पण आपण मला ओळखीत नाहीं. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवून आपण एक पळभर सुद्धां इथें राहूं नका. दूर कुठें तरी आपल्या मुलांबाळांसह निघून जा. कारण आपल्यावर लवकरच एक मोठें संकट

येणार आहे. असली बातमी सांगून आपल्याला भेवडवावें हें त्याहूनही घातकी काम आहे. ईश्वर आपलें कल्याण करो. मला आतां इथें राहतां येत नाहीं. येतों मी. ( जातो. )

**चंद्रा०**—देवा, मी बायको कायरे करूं; कुठें पळून जाऊं? मी कोणाचें काय वाईट केलें आहे? खरेंच पण ज्या या जगांत दुसऱ्याला त्रास देणें ह्मणजे पुण्य व परोपकार करणें ह्मणजे पाप असें गणलें जातें तिथें मी कोणाचें काय वाईट केलें आहे ही भिकारडी सबब सांगण्यांत काय मतलब? ( दोन मारेकरी येतात ) अग बाई हे कोण हे मेलं घटिंगण?

**प० मारे०**—तुझा नवरा कुठे आहे?

**चंद्रा०**—तुझ्यासारख्या घातकी बेरडाला जिथें जातां येणार नाहीं अशा पवित्र जागीं ते आहेत.

**प० मारे०**—तो राजद्रोही आहे!

**मुलगा०**—हरामखोरा, तूं अगदीं खोटें बोलतोस!

**प० मारे०**—अंड्याच्या बाहेर नाहीं पडलास, तोंच इतकें विषारी बोलणें काय? ( त्याच्या अंगावर धावून जाऊन त्याला कट्यारीनें वार करतात. मुलावर चंद्रा पडते. )

**चंद्रा०**—नकाहो नका. माझ्या देखत तरी त्याला मारूं नका? तुमच्या पायां पडतें. मागाल तें देतें.

**प० मारे०**—तूं कशाला द्यायला पाहिजे. सोड त्याला. आण इकडे.

**चंद्रा०**—तोच तुह्मांला पाहिजे असला तर दम धरा. मी त्याला अंगावर घेऊन दूध पाजतें नि मग मला मारून नंतर त्याला मारा.

**प० मारे०**—नाहीं, हा त्या हरामखोर जयाजी अलगुजाचा छोटा सूर आहे. हाच पहिल्यानदां बंद केला पाहिजे. ( पोराला ओढून घेऊन वार करतात. )

चंद्रा—( पोराच्या आंगावर पडून ) नाहींरे बाळा तुला सोडून जायची नाहीं. तूंच हा लोक सोडून चाललास तर मग मला तरी इथें राहून काय करायचें आहे ? पोटीं नऊ महिने ओझें बाळगून तुझा शेवट हा असा बघणें माझ्या कपाळीं यावें ना ? हं आटपा मांगानो, या माझ्या तान्हुल्याच्या कुडींत जीव आहे तोंच मला ठार करा. ( तिच्या सकट पोराचे तुकडे करतात. )

---

## प्रवेश तिसरा.

रक्त भुवन राजवाड्या पलीकडील एका उद्यानांतील झाडाखा-लीं **वीरकांत** व **जयाजीराव** बोलत बसले आहेत.

**वीरकांत**—पोटभरून रडूनच या दुःखी मनाचें सांत्वन केलें पाहिजे. दुसरा मार्गच नाहीं.

**जयाजी०**—रडत बसण्या पेक्षां प्रत्यक्ष कृतांताचा अवतार जी तलवार–ती हातीं धरून अधोगतीला गेलेल्या या आपल्या देशमातेचें जर रक्षण केलें तर कीर्ति तरी होईल. रोज सकाळीं पहावें तो नवी विधवा पती शोकानें हंबरडे फोडीत असते. पोरक्या पोरांच्या भयंकर केविलवाण्या किंकाळ्यांनीं कांनठ-ळ्या बसतात. अशी रोज अनन्वित कृत्यें होऊन त्याच्या दुःखार्णवाच्या लाटा आकाश गिळून टाकण्याचा प्रयत्न करतात. आक्रोश ध्वनीनें गजबजून गेलेलें तें नभोमंडळ आपल्या प्रति-ध्वनीनें त्यानीलभुवनाचा कळवळा येऊनच जणूकाय दुःख प्रदर्शित करीत आहे असा भास होतो.

**वीरकांत**—ज्या ज्या गोष्टी मला कळतात त्या त्या सर्व खऱ्याशा वाटतात व खऱ्यागोष्टी बद्दल मला अतीशय दुःख वाटतें. अनुकूल संधी आली कीं मी तयार आहे. तुह्मीं जें मला सांगितलेंत तें कदाचीत खरें असेल–पण खोटें असावेंसें

वाटतें. त्याला इलाज नाहीं. कारण मालवकेतू-जो तुमच्या मतानें सध्यां वाईट झाला आहे त्याच्याच बद्दल मागें तुमचें मत चांगलें होतें. तो मोठा प्रामाणीक आहे असें तुह्मीं ह्मणत होता. त्याचें नांव उच्चारण्याला जरी माझी दांतखिळी बसते तरी त्याच्यावर तुमचें फार प्रेम होतें. असें असतां उगीच त्याच्याबद्दल आपला वाईट ग्रह कां करता? माझें पोरवय असल्यामुळें मला कोणचीच गोष्ट अजून पुरती कळत नाहीं. तरी पण पला पकडून देऊन बक्षिशी उपटण्या करतां आपण हा प्रयत्न चालवला असावा असें दिसतें. निरुपद्रवी कोकराला क्रुद्ध, पाषाणहृदयीं देवतेला बळी देऊन संतुष्ट करण्याची ही खाशी युक्ती कढलीत तुह्मीं!

**जयाजी**०—असल्या तऱ्हेचा दगलबाज मी नाहीं.

**वीरमणी**०—तुह्मीं जरी नसाल तरी मालवकेतू आहे. राजाज्ञा बजावण्याच्या कामीं सद्गुणांना पिटाळून लावून नीचतेला आलिंगन देण्याचा संभव असतो! तुह्मीं लुच्चे आहांत असा माझा तर्क झाला ह्मणजे तसेच होता असें थेडेंच आहे. नीतिला जरी मनुष्यांनीं फाटा दिला तरी देवांच्या घरीं तिला थारा असतोच. दुष्ट मनुष्याला कदाचित दयाळु मनुष्याचें रूप धारण करतां येईल पण दयेचें रूप नेहमीं तेंच कायम राहतें. मी इतका निर्भिडपणानें बोलतो याबद्दल मला क्षमा करा.

**जयाजी**०—यावरून, ज्या आशा धरून मी इथें आलों आहे त्या सर्व आटपल्या ह्मणायच्या?

**वीरकांत**—ज्या गोष्टींबद्दल मी आपले संशय दाखवले त्यांबद्दल आपल्याला आशा असेल व ह्मणूनच आपल्या आशांचा भंग झाला असेल. तुमचा प्रेमबंध, सौख्यागार असें जें तुमचें कुटुंब त्याचा निरोप न घेतां प्रेमबंधन सैल करून तुह्मीं इकडे विनाकारण कां आटांत? माझ्या मनांत जे कुतर्क

येतात ते तुमची मानहानी करावी ह्मणून मुळींच नाहींत; तर फक्त माझी स्थिती निर्धास्त आहे किंवा नाहीं हें आजमावण्याच्या बुद्धीनें येतात. आपलें बोलणें व कृती रास्त आणि वास्तवीक असली ह्मणजे मग त्यांपुढें माझ्या संशयांचा काय पाड?

**जयाजी०**—पारतंत्र्यानें रक्तबंबाळ झालेल्या हे हताश देशा, तुझ्या जखमांतून आतां अधीक रक्त वाहून तूं खुशाल मर. नीचपणावर चांगुलपणाचें साम्राज्य होत नसल्यामुळें सध्यांच्या जुलमी राजानें आपल्या राज्याचा पाया खुशाल—निर्धास्तपणानें—आतां भक्कम घालावा! सर्व नीलभुवनच नव्हे तर सगळें जग जरी मला कोणी बक्षीस देऊं केलें तरी सध्यांच्या राजासारखा व आपण मला समजता तसा—घातकी, पाषाण-हृदयी, हरामखोर होण्याचें मीं पतकरणार नाहीं. बरें आहे युवराज् वीरकांत महाराज्, आपलें व दत्ताजीचें ईश्वर कल्याण करो. राम राम.

**वीरकांत**—आपण इतके रागावूं नका. जुलुमाचें जूं आमच्या देशावर ठेवलें असल्यानें दिवसानुदिवस तो खचत चालला आहे. प्रत्येक दिवशीं निराळेंच संकट येत असल्यानें आपले देशबंधू दुःखानें धाय मोकलीत आहेत. या सर्व स्थितीवरून आमचा देश एकी नसल्यामुळें लवकरच रसातळाला जाणार आहे. वगैरे सर्व गोष्टीं मला कळतात पण वळत नाहींत त्याला काय करणार? ज्या देशाच्या सिंहासनाचा मीच खरा वारस आतां उरलों आहे—कारण वीरमणी—तर मला सोडून गेलाच:—

**जयाजी०**—काय ह्मणता काय?

**वीरकांत**—खरेंच हो तो गेला. समुद्रांत सहल करण्याकरितां गेला असतां दुर्दैवानें झडप मारून ह्मणा किंवा जल-देवतांना तो आवडला ह्मणा—जो समुद्रांत बुडाला त्याचा आज-पर्यंत पत्ता नाहीं.

**जयाजी०**—हरहर! अशा तऱ्हेनें त्या बालमूर्तींचा शेवट व्हावा ना?

**वीरकांत**—दुर्दैवापुढें इलाज काय? असो. असा जो आतां मी एकटाच वारस राहिलों आहे आणि हक्कानें जर तें राज्य मागायला मी आलों तर तेथले पुष्कळ लोक नव्हे–सर्व लोक माझा पक्ष धरतील यांत संशय नाहीं. या रक्तभुवनाच्या राजानेंही चांगली सैन्याची मदत देण्याचें मला वचन दिलें आहे. पण उपयोग काय? सध्यांच्या राजाला ठार करून पुढें फायदा काय? त्याच्या मागून गादीवर बसणाऱ्या राजापासून जर प्रजेला सध्यांपेक्षां जास्त त्रास झाला तर चालू स्थिती काय वाईट आहे?

**जयाजी०**—त्याच्या मागून राजा कोण होणार?

**वीरकांत**—मीच तो—दुर्गुणांचा पुतळा वीरकांत. माझ्या दुर्गुणांपुढें मालवकेतु तुह्मांला वर्फाच्या स्वच्छ तुकड्यासारखा भासेल आणि स्वभावानें गरीब कोंकरू असा दिसेल.

**जयाजी०**—पिशाच्च योनींत तरी, मालवकेतूवर कडी करणारें एखादें सैतान असेल कीं नाहीं याचीश शंका. मग आपण असें कसें ह्मणतां?

**वीरकांत**—अविचारी, कपटी, क्रूर, खोटा, खुनी, चैनी, घातकी, दुष्ट, लुच्चा, लोभी–वगैरे सर्व पापांचा तो पुतळा आहे हें मलाही कबूल आहे. पण या पापांपेक्षां विषयासक्तीचें जें अक्षम्य पाप माझ्या अंगीं जडलें आहे त्याचा मात्र ठाव लागायचा नाहीं. तुमच्या मुली, बायका, तरुण कुमारीका, ह्माताऱ्या स्त्रिया, बालविधवा या सगळ्यांचा जरी मी उपभोग घेतला तरी माझी विषयवासना तृप्त होणार नाहीं. त्या माझ्या इच्छेआड कोणी कांहीं आणो किंवा येवो–सर्व कांहीं बाजूला गुंडाळून ठेवून मी आपली इच्छा तृप्त करीन. मग सांगा तर-मग असा राजा असणें बरेंका?

**जयाजी०**—अमर्याद विषयवासना हा एक सृष्टीक्रमांत दुर्गुणच गणला आहे. जरी यामुळें रावण, दुर्योधनासारखे राजे धुळीला मिळाले आहेत तरी कांहीं हरकत नाहीं. आपलें जें असेल तें हस्तगत करून घ्यायला कधीं भिऊं नये. कोणाच्याही दृष्टीस न पडतां आपण आपला हा सुखोपभोग चोरून चालविला तरी चालेल. दिसण्यांत साधूचा आव आणला ह्मणजे झालें. रंगभूमीवर नटून सजून आलेल्या नटांवर खूष होऊन त्यांच्याशीं सुद्धां आपखुषीनें चोरून असला व्यवहार करणाऱ्या गरता स्त्रिया, रांडा वगैरे आपल्या देशांत पुष्कळ आहेत. मग आपण तर प्रत्यक्ष राजे. एखादा माणूस स्वतःच्या उद्योगांत जर मोठेपणा मिळवूं लागला तर गृध्रराजाप्रमाणें उचल कीं, टाक घशांत अशा तऱ्हेचा धंदा आपण खचित करणार नाहीं; याबद्दल माझी खात्री आहे.

**वीरकांत**—आपण चुकतां; त्या राक्षसी स्वाभाविक अवगुणांबरोबरच दुसरा एक अपरिहार्य लोभ हा विकार माझ्या अंगीं जडला आहे. मी राजा झाल्यावर अमीर उमरावांच्या जहागिरी घेण्याकरतां त्यांचे खून करीत, धन दौलत उपटण्यासाठीं खऱ्या राजभक्त प्रजेचीं घरें लुटीन, पतिव्रतांना गोशांतून खेंचून काढून त्यांच्यावर बलात्कार करीन—याप्रमाणें जसजसें अधिक अधिक मला मिळत जाईल तशी तशी माझी भूक जास्त वाढेल. बोला, आहे असा राजा उपयोगाचा?

**जयाजी०**—ज्वानीचा भर संपला कीं कामवासना थंड पडते. पण हा लोभ मात्र कठीण. या दुर्गुणाचीं मुळें मोठीं विषारी आहेत. याचमुळें आपले महाराज ठार झाले. अशी जरी स्थिति आहे तरी कोणाचीही भीति मनांत धरूं नका. आपला देश इतका संपन्न आणि सुखी आहे कीं, आपल्या सर्व इच्छा तृप्त होतील. मात्र दुर्गुणांच्या भारंभार सद्गुण पाहिजेत

**वीरकांत**०—राजास उचित जे–उदारता, दृढनिश्चय, धैर्य, धृती, नम्रता, न्याय, भक्ति, मनःसंयम, सत्यप्रीति, स्थिरता व क्षमा हे गुण, त्यांपैकीं माझ्या अंगीं एकही नाहीं. अनेक प्रकारांनीं प्रसृत होणारे अवगुण मात्र माझ्या ठिकाणीं भरपूर आहेत. तेव्हां सांगा कीं, मी राजा जर झालों तर आधिकारमदांत, ऐहिक ऐक्यतेच्या मधूर अमृताला नरकांत टाकून शांततेचा भंग नाहीं का करणार?

**जयाजी**०–विचाऱ्या नीलभुवना, तुझा वाली कोणीच नाहींना?

**वीरकांत**०—जें मी इतकावेळ सांगितलें तसा मी हुबेहुब आहे. तेव्हां असला मनुष्य राजा करण्यास योग्य आहे का? बोला असेल तर?

**जयाजी**०–काय राज्य करण्यास योग्य? असला मनुष्य जिवंत राहणें सुद्धां अयोग्य. हे हतभागी राष्ट्रा, जुलमी राजाचा नायनाट होऊन केव्हां हे तुला पूर्वीचे सुखाचे दिवस येणार? तुझ्या कायदेशीर राजाच्या संतानानें स्वतः-च्या दोषांचें अविष्करण करून आपल्याला नालायक ठरवून घेतलें. सहस्त्रदलासारख्या उत्तम शोभायमान कुलांत उत्पन्न होऊन यानें आपल्या पूर्वजांच्या विमल कीर्तीला काळोखी लावली. तुझा बाप कितीरे पवित्र होता? तुझी आई तर ईश्वर सेवेत निमग्न असतांना स्वर्गवासी झाली. महाराज, ईश्वर आपलें रक्षण करो, मी येतों आतां. तुझ्या विषयीं भलत्यासलत्याच गोष्टी ऐकून मला आपल्या देशाला जायला मात्र आतां तोंड उरलें नाहीं. मना, तुझ्या आशांचा एथेंच शेवट झाला!

**वीरकांत**०—जयाजीराव, तुमच्या उदार व सत्यप्रभाव मनोवृत्तीनें तुमच्या इभ्रतीची व प्रामाणिकपणाची खात्री होऊन माझ्या मनांतले सर्व किंतु नाहीसे झाले. त्या मालवकेतु सैतानानें मला आपल्या कावूंत नेण्याचे कित्येक वेळां कपट प्रयोग

केले. पण मी आपल्यां अल्पबुद्धीच्या जोरावर त्याच्या भुलथापांवर विश्वास न ठेवतां उतावळेपणानें कोणचेंही काम केलें नाहीं. माझ्या प्राणाची व सत्यतेची किंमत मी समान मानतों. आपल्या सर्व व्यवहारांत दक्ष असणारा जो ईश्वर तोच साक्ष देईल कीं, इतका वेळ मी आपल्या तोंडानें जी आपली निंदा करून घेतली ती अगदीं खोटी आहे. या रक्तभुवनांच्या राजाचे सेनापती हुस्सेनखान राजाज्ञेवरून आपल्याला दहाहजार लोकांसह मदत करण्यास येणार आहेत. लढाई करण्याला आपल्याला जितकें सबळ कारण आहे. तितकेंच जय प्राप्ती होण्यालाही आहे, आयती संधी आली आहे ती दवडतां उपयोगी नाहीं.

**जयाजी**०—सुख आणि दुःखोत्पादक गोष्टी एकाचवेळीं प्राप्त झाल्या ह्मणजे त्यांचा मेळ घालणें फार कठीण पडतें. पण हे कोण हे येताहेत इकडे?

**वीरकांत**०—आपले देशबंधु असावेत असा तर्क आहे ? कोण असावेत हें ध्यानांत येत नाहीं. ( रक्तपाल येतो. )

**जयाजी**०—यावें प्रियबंधूराज.

**वीरकांत**०—आतां यांना मी ओळखलें.परमेश्वरा,ज्या कारणांनीं आह्मीं एकमेकांस असे परकी झालों असें वाटतें तीं कारणें दूरकरणें तुझ्याचकडे आहे.

**रक्त**०—महाराजांचें ह्मणणें खरें आहे.

**जयाजी**०—नीलभुवनाची स्थिती पूर्ववतच आहेना?

**रक्त**०—हर हर, कोण ही त्या बिचाऱ्या नीलभुवनाची कुत्तरतोड. त्याची स्थिती काय आहे हें त्याचें त्यालाच समजण्याची मारामार. नीलभुवन हें जरी आमचं जन्मगृह आहे तरी तें सध्यां स्मशान झालें आहे. सध्यां तेथें चांगल्या गोष्टींच्या आभावाचा उत्कर्ष होत असून आभाव ह्मणजे काय हें कोणालाच कळत नाहीं. जिथें नेहमीं आनंद गजर चालायचा तिथें

सध्यां दुःखाच्या किंकाळ्या, सुस्कारे, कण्हणें, विव्हळणें आणि शोकोत्पादक आरडा ओरड—ज्याच्या योगानें सूर्यमंडल भेदून जातें. आतांशा लोकांचा उद्योग काय ह्मणाल तर दुःखाच्या वल्गना गात बसणें हा झाला आहे. प्रेतांचा तर इतका तिटकारा आला आहे कीं, दारावरून प्रेत चाललें असतां हें कोणाचें ह्मणून कोणी चवकशी सुद्धां करीत नाहीं. भल्या मणुष्याच्या जिवाची सुद्धां अशाश्वती इतकी जबरदस्त झाली आहे कीं, फुलालासुद्धां कोमेजायला कांहीं वेळ लागतो.

**जयाजी॰**—वाहव्वा, वर्णन तर मोठें मजेदार असून गमतीचें आहे.

**वीरकांत॰**—बरें ताजी एखादी दुःखकारक बातमी आहे का?

**रक्त॰**—हरघडी नव्या दुःखाची उत्पत्ती होत असल्यामुळें एक गोष्ट घडली कीं लागलींच ती दुसऱ्या क्षणाला शिळी होते. मनुष्य एकदां शिळ्या गोष्टीं सांगूं लागला कीं त्याची थट्टा होते.

**जयाजी॰**—बरें आमच्या घरची काय हकीगत आहे?

**रक्त॰**—कां बरें, सर्व कांहीं ठीक आहे.

**जयाजी॰**—माझी मुलें बाळें सर्व?

**रक्त॰**—सर्व खुशाल आहेत.

**जयाजी॰**—त्या हरामखोरानं अजून त्यांनां धक्का लावला नाहीं हें आश्चर्य आहे?

**रक्त॰**—ज्यावेळीं मी त्यांनां भेटून आलों त्यावेळीं सर्व खुशाल होतीं.

**जयाजी॰**—अहो, नुसतें स्वस्तिक्षेम सांगण्यांत सुद्धां इतकी दरिद्रता कां? सर्व इथ्यंभूत कां नाहीं सांगत?

**रक्त॰**—एकंदर सर्व दुःखाची हकीगत आपल्याला कळविण्याला येण्याच्या उद्देशानें जेव्हां मी निघालों तेव्हां मोठाले बहुतेक सरदार वगैरे बंड करणार आहेत अशी आफवा पसर-

ली होती. आणि ती खरी असेल असेंही वाटतें. कारण मालव-केतूनें सुद्धां आपली फौज सज्ज केली आहे. राज्यकर्त्यांच्या विरुद्ध बंड करण्यास तयार होणाऱ्या मंडळीला आपण मदत करण्याची हीच वेळ आहे. आपण नुसते त्या ठिकाणीं त्यांच्या नजरेस पडलांत कीं, शूर वीर आपोआप उत्पन्न होतील. फार तर काय, बायकासुद्धां लढायला घराच्या बाहेर पडतील.

**वीरकांत**—आमचा तोच बेत आहे. हुस्सेनखानासारखा थोर, अनुभवी, शूर सरदार आपल्या दहा हजार लोकांसह आपल्या मदतीला येणार आहे.

**रक्त०**—आपल्या सारखेंच मलाही आपलें मन चांगल्या गोष्टी सांगून आनंदी करतां आलें असतें. पण उपाय नाहीं. जी फक्त शुष्क अरण्यांतच बोलून दाखविली पाहिजे अशी एक बातमी मी आपल्याला सांगणार आहे.

**जयाजी०**—ती कोणा विशेष व्यक्तीविषयीं आहे किंवा सार्वजनिक आहे?

**रक्त०**—ती विशेषेंकरून जरी आपल्यासंबंधीं आहे तरी जो ह्मणून प्रामाणिक माणूस आहे त्याला ती ऐकतांच दुःख झाल्याशिवाय राह्यचें नाहीं.

**जयाजी०**—असें असेल तर झटपट बोला. माझ्यापासून चोरून ठेवूं नका.

**रक्त०**—जी दुःखकारक बातमी मी आपल्याला सांगणार आहे तशी पूर्वीं आपण कधींच ऐकली नसल्यामुळें संतापानें आपण एकदम माझा तिरस्कार कराल तर तेवढें करूं नये अशी प्रार्थना आहे.

**जयाजी०**—हं आलें ध्यांनांत–समजलों.

**रक्त०**—त्या राक्षसानें आपल्या किल्यावर छापा घालून तो काबीज केला. नंतर आपल्या पत्नी व मुलांचा अती विलक्षण रीतीनें त्यानें वध केला–असं सांगणें? ह्मणजे कसायानें कापलेल्या

हरणांच्या राशीवर आणलें प्रेत नेऊन टाकण्याप्रमाणेंच आहे. पण उपाय नाहीं.

**वीरकांत**—हर हर ! हे दीनदयाळा जगदीशा, काय हा घोर प्रसंग ? जयाजीराव, तो तोंडावरचा पदर करा बाजूला. दुःखोद्गार जर बाहेर पडले नाहींत तर मन आंतल्याआंत कुढून हृदय शतधा होतें !

**जयाजी०**—माझीं मुलें सुद्धांना?

**रक्त०**—मुलें, बायको, गडी, चाकर जें जें ह्मणून सांपडलें तें तें.

**जयाजी०**—अशा तऱ्हेनें मी अंतरवैरी व्हावें ना ? पण काय हो, माझी बायको सुद्धां ना ?

**रक्त०**—होय.

**वीरकांत**—जयाजीराव, शांत व्हा ! या कठोर कृत्याचा सूड घेण्याला प्रतिक्रिया केल्या शिवाय गत्यंतर नाहीं.

**जयाजी०**—त्या रक्तपात्याला पोरें नाहींत हो ? काय करूं. माझी चिमुकलीं सगळीं मुलें—असेंच ना तुह्मीं ह्मणाला ? अरे घुबडा—लांडग्या—सर्वांना एकदम ठार केलेंस काय ?

**वीरकांत**—आजपर्यंत जशीं सोसलींत तसें हेंही संकट शांतपणें सोसून मर्दासारखे लढायला तयार व्हा.

**जयाजी०**—तें तर ठरलेंच. पण मनुष्यधर्माप्रमाणें शोक हा मला केलाच पाहिजे. खरोखर माझ्याचमुळें त्यांची हानि झाली असें ह्मणण्याला काय हरकत आहे ? परमेश्वरा, तूं कारे नाहीं त्यांचा कैवार घेतलास ? अहारे कुलविध्वंसका जयाजी बोकडा, तुझ्या चुकीनें त्या बिचाऱ्यांचे प्राण गेले याची तुला शरम. असो. ईश्वर त्यांनां तेथें तरी सुखी ठेवो.

**वीरकांत**—हे तुमचे दुःखाश्रू तुमच्या तरवारीला विषारी प्रखर पाणी देऊन तिला तीक्ष्ण करोत. शोक सोडून देऊन पुढला कार्यभाग करायला मनाला क्रोधाविष्ट करा.

**जयाजी०**—मला वायकांसारखे आश्रू गाळून जिभेनें वल्गना करतां आल्या असत्या तर बरें झालें असतें. हे जगच्चालका, मला वायुची गती देऊन नीलभुवनांत त्या हरामखोराच्या तोंडाशीं नेऊन भिडीव आणि माझ्या तरवारीच्या आटोक्यांत त्याला आणून ठेव. त्यांतून जर तो निभावला तर मात्र त्याला निर्दोषी ठरवून क्षमा कर आणि मला या जगातून पिटाळून लाव.

**वीरकांत**—हेंच खरें शौर्य. चला आपण रक्तभुवनेश्वराकडे जाऊं. आपल्या सैन्याची तयारी आहे. कोणत्याही गोष्टीची उणीव नसून फक्त परवानगीचाच अवकाश आहे. मालवकेतूचा घडा पूर्ण भरल्यामुळें त्याचा निदानसमय अगदीं जवळ आला आहे. हे स्वर्गस्थ देवतानों, शस्त्रास्त्रें घेऊन सज्ज व्हा. सध्यां जितकें सुख मानवेल तितकें मानून घ्या. कारण रात्रीचें आयुष्य जबरदस्त असल्यामुळें तिच्या पुढें दिवस उगवायची आशा नाहीं.

---

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

त्रिशूलदुर्गांतील एक खोली. **वैद्य** व पाळीवरची एक **दासी.**

**वैद्य**—आज दोन दिवस मी तुझ्या बरोबर जागतों आहे. असें असून तूं सांगतेस त्याची अजून मला प्रचीती कां येत नाहीं? बरें त्याची ही अशी स्थिती केव्हांपासून झाली?

**दासी**—महाराज लढाईवर गेल्यापासून रोज हें मी पाहतें आहे. चांगली गाढ झोंप लागली असतां मधेंच उठतात. खोलीचें कुलूप काढून पत्र लिहायला बसतात. लिहिणें झालें

ह्मणजे तें वाचून पाहून मोहोर बंद करतात नि मग पुन्हां जाऊन निजतात.

**वैद्य**—जागृतावस्थेंतले सर्व प्रकार व निद्रासुखानें प्राप्त होणाऱ्या विश्रांतीचा अनुभव या दोन्ही गोष्टी जर एखादें माणूस एकसमयावच्छेदेंकरून अनुभवूं लागलें तर त्याच्या प्रकृतींत कांहीं तरी क्षोभ झाला आहे असें ठरतें. निद्राभ्रम-विकारांत तूं त्यांनां बोलतांना ऐकलें आहेस का?

**दासी**—हो, हो! पण तें त्यांच्या पाठीमागें कोणाला सांगायची माझी इच्छा नाहीं.

**वैद्य**—निदान मला सांगायला तरी कांहीं प्रत्यवाय नसून उलटा त्यापासून चांगला फायदा होणार आहे.

**दासी**०—कोणी तरी साक्षीदार असल्याशिवाय मी तें कोणालाही सांगणार नाहीं. ( प्रलयादेवी दिवा घेऊन येते. ) तें पहा, त्याच येताहेत इकडे. हीच त्यांची नेहमीची तऱ्हा. या वेळीं त्या अगदीं गाढ झोंपेंत आहेत, आड उभे राहून नीट न्याहाळून पहा.

**वैद्य**—झोंपेंत जर त्या आहेत तर दिवा कसा त्यांनीं आणला?

**दासी**—खोलींत रात्रभर दिवा जळत ठेवावा अशी त्यांची ताकीद आहे आणि तोच हा त्यांनीं आणला आहे.

**वैद्य**—यांचे डोळे तर जागृतावस्थेप्रमाणें उघडे आहेत.

**दासी**—तें खरें, पण यावेळीं त्यांनां कांहीं दिसत नाहीं.

**वैद्य**—हें काय, यांच्या हातांना काय झालें आहे.

**दासी**—रोजच्या दुसऱ्या कामांसारखें हें त्यांचें रोजचें कामच झालें आहे. घटकांच्याघटका रोज अस्सें करतात.

**प्रलया**०—अजून एक डाग राहिला आहे.

**वैद्य**—ऐक, राणीसाहेब कायसें बोलताहेत.

**प्रलया०**--जा मेल्या तूं आतां! कायग तरी बाई निलाजरा आहे हा! काय--वेळ नाहीं का झाली--कसं नि किती कां असेना तें उरकलच पाहिजे--ऐका अं! नर्कांत काळ कुट्ट अंधेर असतो--असं असून--अग आईग--आईईई--असं तुह्मीं कां केलंत ह्मणून तुह्मांला कोण विचारणार आहे? शी--कायगबाईतरी घाण--ही. त्या थेरड्याच्या अंगात इतकं रक्त असेलसं मला नव्हतं ठाऊक? जयाजीरावाला एक बायको होती--मग कुठें आहे ती आतां?-काय-हे हात कधीं--कधीं निर्मळ व्हायचे नाहींत? ऐकलंतका--झालं तें झालं--आतां काय त्याचं? आतां ह्मणून अशी गोष्ट पुन्हां कधीं करायची नाहीं. कायग बाई तरी या रक्ताची घाणही! कांबोजांतली उंची उंची अत्तरं जरी यांनां चोपडली तरी दिखील ही घाण जात नाहीं! अरेरेरेरे!

**वैद्य**--राणीसाहेबांच्या मनोदधींत दुःख फेनानें गर्दी केल्यामुळें त्यांची ही अशी कष्टमय स्थिति झाली आहे.

**दासी**--सगळी पृथ्वी जरी मला दिली तरी हें मन, नि तें राणीपण घेण्याचें मी कधीं पतकरणार नाहीं!

**वैद्य**--हं वाहवा.

**दासी**--हें यांचें भ्रमिष्ट मन लवकर वरें व्हावें अशी माझी इच्छा आहे.

**वैद्य**--निद्रावस्थेंत भ्रमण करणारे लोक जरी मला पुष्कळ माहीत आहेत तरी हा रोग कष्टसाध्य नाहीं असें माझें मत आहे. पुण्य मार्गाशिवाय इतर साधनांनीं हें कधींच वरें व्हायचें नाहीं. हा रोग अननुभूतपूर्व आहे.

**प्रलया०**--जा-थोडें पाणी घेऊन चटकन हात धुवून टाका नि रात्रीचा निजायचा पोषाख करा-असं-भागुबाई सारखं काय करता? वसंतरावाचं प्रेत जमीनीच्या पोटांत

आहे तें–तिथून–आतां कधीं बाहेर यायचं नाहीं ह्मणून दहादां सांगितलं ना ?

**वैद्य**––वाहवा, हें सुद्धां आपलेंच का कृत्य ?

**प्रलया॰**––चला आतां निजायला ! दारावर कोणी ठोठावतें आहे. चला–चला–झालं तें झालं–आतां का तें परत येणार आहे. चला कोणसं आलं–चला–चला ! ( भीतिप्रद किंकाळत जाते. )

**वैद्य॰**––आतां कोठें थेट निजायलाच का या जातील ?

**दासी**––अगदीं थेट.

**वैद्य**––गुप्त कृत्याची परिस्फुटता झाली. अघटित कृत्यांचा परिणाम त्रासदायकच व्हायचा. भ्रमिष्ट माणसें आपल्या गुप्त गोष्टी बधीर उशाला जरी सांगतात तरी त्या लोकांना कळतात. याची प्रकृती ताळ्यावर येण्याला वैद्यापेक्षां धार्मिक उपायच केले पाहिजेत. परमेश्वरा, यांच्यावर कृपादृष्टी ठेवून यांची प्रकृती ताळ्यावर आण अशी माझी तुला प्रार्थना आहे. घडलेला सर्व प्रकार पाहून माझी दृष्टी व मती गुंग झाली आहे. मनांत पुष्कळ विचार घोळतात पण ते बाहेर काढवत नाहींत ! बरें चला. ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

त्रिशूलदुर्गाजवळील प्रदेश. **जोतीबा, आनंदराव, वंगसेन, केदारबा** व **इतर शिपाई** येतात.

**जोतीबा**––वीरकांत, जयाजीराव, रक्तपाल आणि दत्ताजी हे सगळे रक्तभुवनेश्वराचे सैन्य घेऊन तिचे अधिपती होऊन अगदीं नजीक येऊन ठेपले आहेत. सूड घेण्याकरतां ते कसे अगदीं तडफडताहेत. हुस्सेनखानही त्यांच्याबरोबर आहेत. लढाई करण्यास त्यांचीं कारणें इतकीं सबळ आहेत कीं,

एखाद्या अस्थिपंजराला सुद्धां हातीं शस्त्र धरून रक्तपात करायला तीं तयार करतील.

**वंगसेन**--ती फौज वराहारण्याच्या जवळ मुक्काम करणार आहे. तर तेथेंच आपण त्यांनां जाऊन मिळूं.

**आनंद०**--सैन्यांतल्या योध्यांची तुझांला कांहीं माहिती आहे कां?

**केदारबा**--आनंदराव, त्या फौजेंत सगळे तरुण योद्धे भरलेले आहेत. ही पहा त्यांची याद!

**जोतीबा**--बरें माळवकेतूची कशी काय तयारी आहे.

**आनंद०**--त्रिशूल दुर्गाची तटबंदी करून तो त्यानें लढण्यास अगदीं सज्ज केला आहे. त्याच्याविरुद्ध उठलेल्या कांहींचें असें ह्मणणें आहे कीं, तो अगदीं वेडा होऊन गेला आहे. कांहीं जे त्यांच्या पक्षाला धरून राहिले आहेत ते ह्मणतात कीं, तो शौर्यमदानें बहकला आहे!

**वंगसेन**--विश्वासघातानें केलेल्या खुनांबद्दल हरघडी उत्पन्न होणारीं बंडेंच त्याला दोषी ठरवीत नसून त्याच्या हातांत भिनलेल्या खूनी रक्ताचे डाग सुद्धां विस्तवाप्रमाणें चटके देऊन त्याला निमकहराम ठरवीत आहेत. पापाच्या भीतीनें राजाज्ञा शिरसा वंद्य मानलीच पाहिजे, ह्मणूनच ज्यांनां तो हुकूम फर्मावतो ते तिचें उल्लंघन करीत नाहींत, बाकी त्या नीचाबद्दल त्यांच्या मनांत तिळभर सुद्धां प्रेम नाहीं. एखाद्या खुजाला कुंभकर्णाचा अंगरखा घातला तर तो जसा लडबडून पडेल तशी मालवकेतूची राज्याधिकारानें स्थिति झाली आहे.

**जोतीबा**--त्याच्या देहगृहामध्यें आपल्याला राहावें लागतें ह्मणून त्याचें मनच त्याला डवचतें आहे, यावरून तो वेडे वेडे चार करतो ह्मणून त्याच्या दूषित मनाला कोण दोष देणार?

**आनंद०**--बरं चला--ज्या ठिकाणीं आपली सेवा अर्पण करणें योग्य आहे तेथें जाऊं, व आपल्या देशाच्या क्षयाच्या

भावनेवर ज्या औषधाची योजना झाली आहे तें सेवन करूं आणि त्याच्या आरोग्य प्राप्तीकरितां आपण आपल्या रक्तानें न्हाऊं घालूं.

**केदार०**-किंवा राजपुष्पाला टवटवी येण्याइतका रुधिर द्रवाचा स्राव करूं ! चला सरदारहो हाच वराहारण्याचा रस्ता. ( जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

त्रिशूल दुर्गांतली एक खोली-**मालवकेतू वैद्य** आणि **एक चाकर.**

**मालव०**-बस्स-पुरें-अधिक ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. जाऊंदेत-सर्व गेले तरी हरकत नाहीं. वराहारण्य-त्रिशूलदुर्गा पर्यंत चालून येईपर्यंत मला कोणाचीही भीति नाहीं. वीरकांत व दत्ताजी अजून पोरें आहेत ! वीरमणी तर आटपलाच ! याही दोघांना उडविलें कीं झालें. अन् जिवंत असले म्हणून काय झालें ! ते तरी स्त्रियांच्या उदरांतूनच निघाले आहेत किनई ? त्या दोघांपैकीं दत्ताजीला ठेवितां उपयोगी नाहीं. वसंतराव भुजंगाची ती अवलाद असून डाकिणीच्या भविष्याप्रमाणें माझ्या मागून या गादीवर बसणार आहे. तेव्हां प्रथम त्याचीच आहुती घेतली पाहिजे. असो. मानवी कृत्यांचे भावी परिणाम सांगणाऱ्या पिशाच्चांनीं तर मला-'तूं कोणच्याही योनी संभवा पासून पीडा पावणार नाहींस'-असा वर दिला आहे. तेव्हां आतां मला कोणाची भीति उरली आहे ? नीच हरामखोर, सरदारांनो, जा खुशाल त्या रक्तभुक्त्यांना जाऊन मिळा ! तुमच्या जाण्यानें-मी जी हिम्मत धरून राज्य हांकतो आहे-ती कधींच खचायची नाहीं. ( हुजऱ्या येतो ) कां तोंड कां असें

जोडे मारल्यासारखें केलें आहेस ? चल निघ इथून ! तोंड काळें कर. असा मरतमढ्यासारखा माझ्या पुढें उभा राहूं नको.

**हुजऱ्या**—एकंदर दहा हजार आहेत.—

**मालव०**—कोण गाढवें कीं काय ? मग दे सोडून त्यांना उकीरड्यावर. आपल्या राज्यांत उकीरड्यांना काय तोटा आहे.

**हुजऱ्या**—तसें नाहीं सरकार, लष्करी शिपाई आहेत.

**मालव०**—चल निघ, हो चालता इथून. ही बातमी ऐकल्यावर रागानें तोंड लाल व्हायचें–का भीतीनें पांढरें ? जा तोंड ओरबडून घे ह्मणजे तरी लाल होईल ? कुठलेरे शिपाई ? कां वाचा बसली कीं काय ? वाः–ओंठ तर जास्तच फिकट पडायला लागले ! गाढवा बोल कुठले शिपाई ते ?

**हुजऱ्या**—रक्तभुवनाचे सरकार.

**मालव०**—चल–चालता हो ( हुजऱ्या जातो. ) चंद्रराव अहो चंद्रराव–ही स्वारी मला सदैव आनंदी करील–किंवा–याच क्षणीं माझा निकाल लावील–हा विचार मनांत आला ह्मणजे माझें मन उद्विग्न होऊन–मी व्यर्थ इतके दिवस जगलों असें वाटतें ! माझा आयुष्यभर करपून जाऊन पिकल्या पानाप्रमाणें मला वृद्ध दशा आली आणि या आवस्थेंत **भक्ति मानमान्यता, आज्ञाधीनता** व **मित्रमंडळ** या अवश्य गोष्टींची अती अवश्यकता असते. पण मला आतां त्यांची आशा नाहीं. जे माझा तोंडावर बहुमान करतात, तेच मागें मला शाप देतात. माझ्या प्रजेला जें दुःख होत आहे तें टाळण्याचें जर तिच्या हातीं असतें तर उत्तम झालें असतें ! चंद्रराव अहो चंद्रराव–

( **चंद्रराव** येतो. )

**चंद्रराव**—काय आज्ञा आहे सरकार ?

**मालव०**—ताजी बातमी काय आहे ?

**चंद्रराव**—सरकारांना जें कळलें तें खरें आहे असें मागून कळलें.

**मालव०**—कांहीं हरकत नाहीं. या शरीरांतलें मांस तुटून जाऊन हाडांचा चुराडा होईपर्यंत मी लढणार. माझें चिलखत आणा.

**चंद्रराव**—इतक्यांतच त्याची जरूरी नाहीं.

**मालव०**—नाहीं. तें आतांच घातलें पाहिजे. चहूंकडे घोडेस्वार पाठवून धुमाकुळ माजवा, जे कोणी भ्याले असतील त्यांना एकदम फांशी द्या. आणा माझें चिलखत, काय वैद्यराज तुमच्या रोग्याची प्रकृती कशी काय आहे? ( चंद्रराव जातो. )

**वैद्य**—भ्रांतिक कल्पनातरंगादि मनोभ्रमाच्या लहरी वारंवार येत असल्या कारणानें विश्रांति न मिळून राणीसाहेबांना अल्पसा ज्वर येतो. दुसरें कांहीं नाहीं.

**मालव०**—स्मरणशक्तीमध्यें फार दिवसांचें सांठलेलें दुःख नाहींसें करणारा एखादा काढा, मस्तक भ्रमामुळें होणारा त्रास धुवून काढणारें एखादें मलम किंवा दुःखानें जडत्व पावलेल्या अंतःकरणांतून मानसिक दुःखाचा निकाल लावणारी एखादी मात्रा—यांपैकीं जर तुमच्याजवळ कांहीं असेल तर देऊन तिचें दुखणें बरें करानात तेवढें.

**वैद्य**—अशा रोगावर रोग्यानेंच आपल्याला उपचार करून घेतले पाहिजेत.

**मालव०**—मग द्यानांत त्या तुमच्या मात्रा, गोळ्या, भस्में शेणखळींत फेंकून, टाका जाळून ती तुमची त्र्यंबकी न् तो वाग्भट. चंद्रराव—चिलखत. माझा भाला आणा, वैद्यबुवा, माझे सर्व सरदार शत्रूला जाऊन मिळताहेत, चिलखत आणा, —वैद्यबुवा, माझ्या बायकोची प्रकृति जर तुह्मीं सुधराल तर मी तुमची स्तुति इतक्या मोठ्यानें गाईन कीं, तिचा प्रतिध्वनी होऊन यांतून पुनः ती तुह्मांला ऐकूं येईल. चंद्रराव चिलखत

आणा.-कायहो, या अशुभमुखी रक्तभुवन्यांचा या देशांतून निचरा होण्याला एखादें ढाळक आहे का तुमच्याजवळ?

**वैद्य**—मला जसें माहीत आहे तसें सरकारांनाही माहीत असल्या कारणानें सेनाभेषजाची तयारी चाललीच आहे.

**मालव०**—चिलखत—चंद्रराव—चिलखत आणा. त्रिशूलदुर्गापर्यंत वराहारण्य चालून येईतों अवघड प्रसंग आणि मरण—या दोहोंनाही मी भीत नाहीं. ( जातो. )

**वैद्य**—या स्वारीच्या तडाक्यांतून एकदां येथून जिवंत निभावून गेलों ह्मणजे सुटलों. बक्षीसाच्या आशेवर राहावें कोणी.

( जातात )

---

## प्रवेश चवथा.

**वराहाअरण्याजवळील प्रवेश.**—शिंगें, ढोल वाजताहेत!

**वीरकांत, दत्ताजी, हुस्सेखान, जयाजीराव, जोतीबा, वंगसेन, केदारबा, रक्तपाल** वगैरे लष्करी लोक येतात.

**वीरकांत**—सरदारहो, पुर्वींप्रमाणें आनंदानें आपल्या घरीं सुखानें राहाण्याचा दिवस अगदीं जवळ आला आहे.

**जोतीबा**—यांत काय संशय.

**हुस्सेन०**—आप्के साम्ने जो ये जंगल दिखताहै उस्का नाम क्या है भला?

**जोतीबा**—याला वरहारण्य असें ह्मणतात.

**वीरकांत**—मालवकेतूच्या हेरांनां आपल्या फौजेची गणती करतां येऊं नये ह्मणून सैनिकहो, या रानांतील झाडाची एक एक फांदी तोडून ती आपल्याजवळ घ्या व कूच करतांना आपल्यावर छत्री सारखी धरा,

**हुस्सेन०**--वो नमक् हराम सब फोजकेसाथ त्रिसूल दुर्गमे आराममे बैठा है. और आप्के सात जंग देनोको तयार है, इतनीही खबर आपकू मिली है--उस्से जियादी कुछ नहीं.

**वीरकांत**--त्याची सर्व भिस्त त्याच किल्यावर आहे. कारण ज्या ठिकाणाहून सैन्य मिळण्याची त्याला आशा होती तेथल्या लहान मोठ्या सर्व सरदारांनीं त्याच्या विरुद्ध बंडें केलीं आहेत. किल्यावर जी फौज आहे तिची तरी हीच व्यवस्था आहे. तेथले सर्व लोक त्याच्या धमकावणीलाच मात्र भिऊन तिथें राहिले आहेत. कां कीं, त्यांचीं मनें अगदीं उलटलेलीं आहेत.

**जयाजी०**--हातीं घेतलेलें काम तडीला जाईपर्यंत आपलीं खरीं मतें कधींही उघड करूं नयेत. चला--मोठ्या हुशारीनें शिपायागिरी आपल्याला वजावयाची आहे.

**हुस्सेन०**--आप्ने हातसे कित्ना काम हो चुका है और करनेका कित्ना बाकी है उस्का नेहायत बराबर लज्ज निकलनेका मौका बिलकुल नज्दीक आन् पहुंचा है. आप्ने दिलके उपर और सीरमे आनेवाले सब विचार कुच न मालूम होता के झूट है या सच्चेहै. लेकिन् जंग करना सो पुरा विचार करके मिले मौकेपर करना. उस्के वास्ते अबूसब् तयार रहो.

( जातात. )

---

## प्रवेश पांचवा.

**त्रिशूलदुर्ग. मालवकेतू, चंद्रराव**--वगैरे डंका निशाणें घेऊन येतात.

**मालव०**--आमचा हा त्रिशूलदुर्ग इतका मजबूत आहे कीं, कोट्यावधीं माणसांच्या जबरदस्त तोफांच्या गोळ्यांचाही धिक्कार करील. सर्व जगातलें धान्य, पाणी संपून रोगाच्या सांथीनें

बाहेरचे सर्वलोक मरेपर्यंत पाहिजे तर या किल्ल्याला वेढा घालून बसा म्हणावें–आमचें निशाण असेंच तटावर फडकत राहणार. माझ्या पक्षाचे सरदार जर शत्रूला मिळाले नसते तर मी अशा नेटानें समरांगणांत लढून शौर्य गाजवलें असतें कीं, कार्तिकस्वामी खूषच झाला असता. पण उपयोग काय, ( पडद्यांत बायकांची ओरड होते. ) काय आहे–रडारड कसली ?

**चंद्रराव**—( ऐकलेंसें करून ) बायकांचा ओरडा आहे. काय आहे तें पाहून येतो. ( जातो. )

**मालव०**—माझ्या घातपातादी विचारांशीं क्रूरकर्माची सलगी झाली असल्यामुळें भीतीची गोडी या हृदयांतून नाहींशी होऊन ती कःपदार्थशी वाटूं लागली आहे. ( चंद्रराव येतो, कयहो, काय झालें ?

**चंद्रराव**—प्रलयादेवी राणीसाहेब आपल्याला सोडून परलोकीं गेल्या.

**मालव०**—आजच जायचें काय खोळंबलें होतें ? उद्यां कां नाहीं गेली ? पण उद्यां–हाय हाय ! खरोखर जीवित म्हणजे निव्वळ छाया आहे ! नाटकांतलें एखादें हलकें पात्र रंगभूमीवर येऊन कांहीं वेळ मोठ्या डौलाचे हावभाव करून शेवटीं संतापानें किंवा दुःखानें पडद्यांत निघून जातें व नंतर प्रेक्षक समुदायांत त्यांच्याबद्दल एक चकारसुद्धां निघत नाहीं, तद्वतच या जीवाची स्थिति आहे. आमची इहस्थिति म्हणजे नुसती वेड्या माणसाचा भाषण चमत्कार ( जासूद येतो ) हें. कोण ? या आपल्याला कांहीं जिव्हाचापल्य दाखवायचें असेल ? हं चालूं द्या.

**जासूद**—मी जें पाहिलें आहे तें सांगण्याकरितां मी इथें आलों आहें. पण तें कसें सांगावें हेंच मला कळत नाहीं.

मालव०--पुरे करा आतां--हं--सांगा-सरकार कायतें सांगा-आतां !

जासूद--टेंकडीवर मी पहारा करीत असतां वराहारण्याकडे टेहेळणी केली तों असें दिसलें कीं तें सर्व रानच आपल्या किल्याकडे चालून येत आहे.

मालव०--गाढव आहेस--चल--चालता हो ! झाडें कधींच चाललेली ऐकली आहेस का ? उद्यां म्हणशील-हिमालय सह्याद्रीला भेटायला निघाला आहे.

जासूद०--माझ्या सांगण्यांत जर काडीभर चुकी झाली तर मला हवी ती शिक्षा करावी.

मालव०--जर तुझें बोलणें खोटें ठरलें तर ध्यानांत ठेव जें झाड प्रथम दिसेल त्यावर तुला उलटा टांगून तिथल्यातिथें अन्नपाण्यावांचून सुकवीन व खरें ठरलें तर माझ्या साठीं तुझें कांहीं जरी झालें तरी मला त्याची पर्वा नाहीं. बस्स-आटपलें. माझा निश्चय ढळला-त्या डाकीणीचें बोलणें खरें ठरलें. भविष्या प्रमाणें-वराहारण्याला पाय फुटून तें चालू लागलें. मग आतां काय ? आमचा घडा भरला चल-मालवकेतू-शस्त्रास्त्रें घेऊन बाहेर पड. पळून गेलास तरी मरण थोडेंच चुकतें आहे. मग धारातीर्थीं अंगांत चिलखत आडकवून मेलेलें काय वाईट ! चला शिंगें फुंका--ढोल वाजवा-कर्ण्यांचे भूत्कार करा. सैनिक हो, बाहेर पडा. वाहा-वाऱ्या जोरानें असाच वाहा. हे पंच महाभूतांनों, या वेळीं तुम्हीं क्रोधाविष्ट होऊन हें जगयंत्र एकदम विस्खालित करून टाका.

( जातात. )

## प्रवेश सहावा.

त्रिशूल दुर्गापुढील जागा—वीरकांत, हुस्सेनखान, जयाजीराव, दत्ताजी, केदारबा, बंगसेन, जोतीबा, रक्तपाल वगैरे सैनिकांसह झाडांच्या खांद्या घेऊन येतात.

**वीरकांत**—आतां खांद्या फेंकून देऊन आपलें खरें स्वरूप प्रगट करा. कारण आपण त्रिशुल दुर्गाच्या अगदीं नजीक येऊन ठेपलों आहोंत. सेनापाति हुस्सेनखान साहेब, आपण व मी विनीकडून मोर्चे बांधू व जयाजीराव आणि दत्ताजीराव आपल्या योग्यतेनुरूप बाकीचें काम करतील.

**हुस्सेन**—उस गद्दार और हराम जादेकी फौज आज शामूकोंभी जब मेरे रूबरू आएगी तो जबीके जबी उसके साथ लढाई करके उस्को पीछे हटा देंगे येहु हमारे लब्ज जोकभी झूट बनेगे तो आप मेरी गर्दन चाकू करो.

**जयाजी०**—आतां होणाऱ्या रक्तपालाचा अग्रदूत जो कर्णे, तुताऱ्या, नगारे यांचा अवाज तो पुढें धाडून मालवकेतूला जागा करा. ( नगारे, कर्णे, तुताऱ्यांचा अवाज करीत जातात.)

---

## प्रवेश सातवा.

रणमैदानाची दुसरी बाजू. **मालवकेतू** सशस्त्र येतो.

**मालव०**—शत्रूंनीं मला या ठिकाणीं जखडबंद करून टाकलें आहे! कांहीं हरकत नाहीं. अस्वलाप्रमाणेंच त्यांच्यांशीं मी झुंजणार. स्त्रीच्या उदरापासून उत्पन्न न झालेल्यांचीच मला कायती भीति—इतरांची काय पर्वा. ( वीरकांत येतो. )

**वीरकांत**—अरे चोरा—तूंच नाहीं का खून करून दुसऱ्याची संपत्ती उपटणारा राहूचा भाऊ केतू. हरामखोरा,

प्रत्यक्ष वेताळाला सुद्धां तुझें नांव उच्चारण्याची लाज वाटेल. माझ्या बापाचा, वसंतरावाचा आणि जयाजीरावाच्या कुटुंबाचा खून करणारा तूंच नाहींका तो रक्तपाती राक्षस.

**मालव०**--हं-खबरदार-विचार करून बोल. जा-इथें उभा राहूं नको, फुकट मरशील.

**वीरकांत**--विचार कसला--ही माझी तरवारच आतां तुला विचार करायला लावून केल्या कर्माचें प्रायश्चित देईल.

( दोघे लढतात व वीरकांत मरून पडतो. )

**मालव०**--मूर्खा, नको ह्मणत असतांना हट्टानें फुकट प्राणाला गमावलास. तूं तरी स्त्रीच्या उदरापासूनच झाला आहेस कीं नाहीं? स्त्रीच्या उदरापासून उत्पन्न झालेल्यानें हातांत शस्त्र धरून मला ठार करण्याकरितां यावें आणि त्या शस्त्राचा मी धिक्कार करून उलट त्यालाच ठार मारावें याची मला मोठी गम्मत वाटते. (जातो व जयाजीराव येतो. )

**जयाजी०**—तिकडच्या बाजूला हवेंत तरवारीचे आवाज ऐकूं येत आहेत यावरून तो तिकडेच असावासें वाटतें. मालवकेतू, तूं जर माझ्या हातून मेला नाहींस तर पिशाच्च योनींत गेलेली माझी बायको व पोरें माझ्या भोंवती गराडा घालून मला त्रास देतील. ह्मणून दाखीव आतां मला आपलें तोंड. रक्तपाती राक्षसा तुझ्याच करितां ही उपसली आहे. लढाईकरितां भाऊनें आणलेल्या सैन्यावर मी हिला कधींही चालवणार नाहीं. तुझी जर गांठ पडली नाहीं, तर ही खिडी पडून धार न गेलेली अशीच मी म्यानांत ठेवीन. प्रालब्धानें तो सांपडावा हीच इच्छा आहे. ( जातो व हुस्सेनखान आणि दत्ताजी येतात. )

**हुस्सेन०**—दत्ताजीराव, इस बाजूसे यह किला बिना तकलीफ् उठाते अपने ताबेमे आगया. उस नफ्फर राजाके लढवय्ये सिपाही लोठा दोनों बाजूको बडे करारीसे लढते हैं.

सब सरदार तो बहोत रनसूरीसे लढ गये. आजका रोज आपना यकीन है. अबी जियादा करनेका कुइ बाकी नही.

**दत्ताजी०**—आपल्याला शत्रु इतके गमतीचे मिळाले आहेत कीं, ते तरवारीचे सर्व वार मुद्दामच हवेवर करतात.

**हुस्सेन०**—चलो अब, किलेमे चले जाइंगे. ( जातात मालवकेतू येतो. )

**मालव०**—समोर येऊन सामना देणाऱ्या प्राण्यांना चीत करायचें सोडून अशा आणीबाणीच्या वेळीं स्वतःचीं हत्यारें स्वतःवर चालवून प्राणत्याग करण्यांत अर्थ काय? मी कधींही तसें करणार नाहीं. ( जयाजीराव येतो. )

**जयाजी०**—हरामखोरा, चल फिर माघारा, चाललास कुठें?

**मालव०**—तुझ्या सर्व कुटुंबाच्या खूनांनीं माझें हृदय भरून गेलें आहे आणि ह्मणूनच तुझ्याशीं लढण्याची मी टाळा-टाळ करीत होतों. त्या वीरकांत कार्ट्याला नको—नको ह्मणत असतां व्यर्थ माझ्यांशीं लढून त्यानें आपले प्राण मात्र फुकट गमावून घेतलेन.

**जयाजी०**—हाय–हाय ! माझी सगळी खटपट व्यर्थ गेली. काय तुं त्यांना मारलेंस ?

**मालव०**—होय–आणि तो दत्ताजी कार्टा कुठें आहे? त्यालाही ठेंचणार.

**जयाजी०**—अरेरे–घात झाला. युवराज वीरकांत ठार झाले अँ. असो प्रभुसत्ता ! दत्ताजी जीवंत आहे एवढें तरी सूख !

**मालव०**—यालाही उडवतो. घेऊन ये इकडे. तुलाही आतांच्या आतां–पण नको–जा इथून–तुझ्याशीं अधीक बोल-ण्याची माझी इच्छा नाहीं.

**जयाजी**—मलाही नाहीं. माझी तरवार तुझ्याशीं कायतें बोलेल! तुझ्या रक्तपाती कृत्यांचें वर्णन करायाला प्रत्यक्ष सरस्वतीनेंही हात टेकले आहेत. ( दोघे लढतात. )

**मालव०**—जा–चालताहो–तुझे श्रम व्यर्थ आहेत. अछेद्य वायुवर वार केले असतां जितका रक्तास्राव होईल तितकाच माझ्यावर वार केले असतां होणार आहे. माझें जीवित जादूनें भारलेलें असल्यामुळें तें, स्त्रीच्या उदरापासून जन्मलेल्याला कधींही हार जाणार नाहीं

**जयाजी०**—आतां त्या जादु टोपीची आशा सोड. ज्या नर्कवासी पिशाच्चांनीं तुला हें सांगितलें त्यांनींच तुला असें सांगयाला पाहिजे होतें कीं, जयाजीराव हा इतर माणसांप्रमाणें जन्मलेला नसून अकालींच त्याला त्याच्या आईच्या गर्भांतून पोट फाडून बाहेर काढला आहे.

**मालव०**—असें सांगणाराची जीभ जळून खाक होवो. त्या दुटप्पी बोलणाऱ्या डाकिणींवर इतःपर कोणींही विश्वास ठेवूं नये. आतां माझें धैर्य खचलें ! त्यांच्या त्या द्व्यर्थी बोलण्यामुळें त्यांच्या वजनाला बाध न येतां त्यावर विश्वास ठेवणारीं माणसें मात्र फसतात. जा चालता हो. मी तुझ्याशीं लढत नाहीं.

**जयाजी**—तर मग शरण ये.

**मालव०**—काय शरण—ते शब्द पुन्हां उच्चारूं नको. शरण येऊन, ज्यांवर मी राज्य केलें त्यांच्याकडून मुकाट्यानें छीःथूः करून घेऊं? तें तर कधींच होणें नाहीं ! वराहारण्य त्रिशुल दुर्गापर्यंत चालत आलें व तूंहीं स्त्रीच्या उदरापासून जन्मलेला नाहींस असें ठरलें. तेव्हां आतां माझें आयुष्य संपलें असें जरी मला वाटतें आहे तरी या देहांतून प्राण निघून जाईपर्यंत शौर्याची ढाल पुढें करून मी लढणार. हं चल —हो तयार ‘ बस्स पुरे ’ असें जो ह्मणेल तो नरकांत पडेल.

( दोघे लढत निघून जातात. )

## प्रवेश आठवा.

रणमैदान. अहितकर्मी, मानमोडी, उरफोडी, बरगडतोडी व इतर डाकीणी आनंदानें नाचत येतात!

मान०—कशी झाली;

उर०— उत्तम झाली!

बरगड०— नामी झाली?

अहित०—चट्टामट्टा कसा झाला?

उर०— आपल्या मदतीनं चांगला झाला.

बरगड०— तुमच्या हातभारानं उत्तम झाला.

मान०— तुमच्या साह्यानें नामी झाला.

अहित०—माझ्या मायावी भूतांचीं मालवकेतूला व्यर्थी आर्शीर्वाद देऊन कसा नाशवन्हीकडे फरफर ओढीत नेला.

उर०—आणि त्याच भुतांनीं वसंतरावाच्या मुलाला राज्य दिलें.

अहित०—आहेतच तीं तशी शहाणी.

बरगड०—मनुष्य योनींत भातुकली खेळणाऱ्या पोरांना त्यांच्या आया जशा थालीपीठ दशम्या खेळायला देतात तसें तुह्मीं आह्मांला मालवकेतु दिलात.

मान०—अन् आह्मीं त्याचा चट्टामट्टा केला. मी खूप त्याचें रक्त प्यायलें.

उर०—मी त्याचें सगळें मांस खाल्लें. ही पहा त्याचीं हाडें.

बरगड०—यांत काय आहे आतां! मी त्या नळयांतला सुर्वा केव्हांच खाऊन टाकला.

अहित०—बरें चला आतां घरीं—मध्यान रात्र उलटली! पुरे झाला आतां हा तुमचा डाकिणींचा विलास! गात नाचत घरीं जाऊं (सर्व गात नाचत जातात.)

## प्रवेश नववा.

( त्रिशूलदुर्गापुढला प्रदेश )

दत्ताजी, हुस्सेनखान, रक्तपाल, केदारबा वगैरे सर्व सरदार विजयाचा झेंडा फडकावीत येतात.

**दत्ताजी**—ज्या आपल्या स्नेह्यांची चुकीनें गांठ पडली नाहीं ते सुखरूप घरीं यावेत अशी माझी इच्छा आहे.

**हुस्सेन०**—आज थोडे तो भी अपने मर्द चाक हुवे है इस्मे बिलकूल शकनहीं. ऐसा है तो भी अपना नियतका निशान अफ्लाकमें अच्छा तऱ्हेंसे फडक जायगा–ऐसे लब्ज निकलनकु कुछ डर न मालुम होती.

**दत्ताजी**—पण आपले वीरकांत महाराज अजून कां परत येत नाहींत?

**रक्तपाल**—त्यांनीं आज मोठी शिपाईगिरी बजावून या जगांतली आपली इतिकर्तव्यता संपविली. कोणऱ्याही तऱ्हेची हिंमत न खचूं देतां ज्या ऐटीनें ते लढत होते त्याच ऐटीनें त्यांनीं आपल्या पराक्रमाची सीमा करून अखेरीस आपला देह विश्रांतीकरितां रणमंचकावर ठेविला. आपल्या शौर्यसामर्थ्याचें उदाहरण जगाला दाखविण्यापुर्तीच त्यांची आयुष्यमर्यादा होती तेथें नाइलाज आहे.

**हुस्सेन०**—बहोत बुरी बात होगई.

**रक्तपाल**—त्यांची योग्यता फार मोठी–अमर्याद. तेव्हां त्यांच्या योग्यतेप्रमाणें आपणा सर्वांना दुःखही अपरिमित झालें आहे हें रास्तच आहे.

**हुस्सेन०**–उन्को जितने समशेरके तडाखे लगे है उतने सब उस्के साम्ने या पीटपे है?

**रक्तपाल**–सगळे पुढेच आहेत. छातीवर.

**हुस्सेन०**—यही अच्छी बात है. दूसरे जिंदगीमें शुक्रेमोला उस्को नेहायत खुषीसे स्वसूरीकी जगा देगा. मरना तो एक रोज है. लेकिन् जंग खेलते खेलते मरना यही बडी उम्दी–लाहोल् बिला–अछी बात है.

**दत्ताजी**—तें जरी खरें आहे तरी, त्यांच्याचकरितां हा एवढा व्यूह रचला असल्या कारणानें त्यांच्या अकालीं मरणानें आपलें प्रत्येकाचें अंतःकरण दुःखानें भरून जाणें रास्तच आहे. आतां आपल्या दुःखाला सीमा राहिली नाहीं.

**हुस्सेन०**—येतो सच बात है. लेकिन अब क्या करना? इस जमीमे जो कुछ करनेका था सो उनोने सब किया और उस्की आखर बी अच्छा तऱ्होंसे होगईहै. अब् खुदाके कदमपास अब् सबोने इत्नाही बडे उल्फतसे अर्ज करना लाजीम है के, उस्को हमेषा अल्लानें आपकेपास बडे मिजाजसे और लायख तेहेनातमें रखना. ( सर्व गुढघे टेंकून हात जोडून ईश्वराची प्रार्थना करीत असतां–**सयाजीराव–मालवकेतूचें** मुंडकें भाल्यावर अडकावून घेऊन येतो–सर्व उठतात ).

**जयाजी०**—सरदार हो, त्या दुष्ट्या, चोर, क्रूर दैत्य, रक्तपाती मालवकेतूचें शीर कोठें बसलें आहे पहा! त्याचें हें मुंडकें येथें पाहून आपल्याला जितका आनंद होतो आहे त्यापेक्षां शतपट ज्यास्त युवराज वीरकांत महारजांच्या अकालीं मरणानें दुःख होत आहे, हें जरी खरें आहे तरी आयुष्यांत येणाऱ्या प्रसंगांनां पाठ देणें प्रत्येकाचें कर्तव्यकर्म आहे. नीलभुवनाच्या गादीचे खरें वारस जरी ईश्वरीसंकेतानें नाहासे झाले, तरी वसंतरावांचा या गादीशीं लांबचा संबंध आहे. तेव्हां त्यांचे चिरंजीव दत्ताजीराव यांसच तक्ताधिपती करून त्यांचें अभिनंदन करावें, अशी माझी इच्छा आहे! आपल्या राष्ट्रांतील बहुतेक मानकरी आज संनिधच आहेत तेव्हां माझ्याप्रमाणें तेही यांचा जयजयकार करतीलच.

**सर्व०**—राजाधिराज-नीलभुवनेश्वर महाराज यांचा जयजयकार असो.

**दत्ताजी**—( आत्मगत ) त्या डाकिणीचें बोलणें जरी खरें ठरलें आहे तरी पण मी त्यांची आराधना करणार नाहीं. ( उघड ) आपण केलेली योजना मान्य करून-जरी मला आपण राज्यपद दिलें आहे तरी-आपण सर्वांनीं एक राजप्रतिनिधिमंडळ स्थापन करून-**जयाजीरावांना**-प्रतिनिधी करावे अशी माझी इच्छा आहे.

**सर्व०**—( जयाजीरावाशिवाय ) आमचेंही ह्मणणें तसेंच आहे.

**दत्ताजी**—मी आपणा सर्वांचा फार आभारी आहे. ही योजना **जयाजीराव** नाकारणार नाहींतच.

**जयाजी०**—सर्वांची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. सरदार हो, डाकिणींच्या जादूटोण्यानें आपली प्राणज्योत अभिमंत्रित आहे असें मानणारा कृतघ्न **मालवकेतू** आज या जगांतून नाहींसा झाल्या कारणानें पुन्हा आपण पूर्ववत् सर्व सत्यपक्षीय झालों. सर्वांच्या योग्यतेनुरूप उदात्त बक्षिसें-किताब वगैरे देण्याचा समारंभ लवकरच केला जाईल. अधिक जीं कामें करायचीं आहेत तीं कालानुरूप करूं. त्या काकदृष्टि जुलमी राज्याच्या कपटजालांत सांपडूं नये ह्मणून देशत्याग करून गेलेल्या आपल्या सर्व राष्ट्रीयांस प्रथम परत बोलाविलें पाहिजे. त्या मेलेल्या कसाई राजाच्या आणि आपल्या नांवाप्रमाणें कर्म करणाऱ्या त्या आत्मघातकी प्रलयादेवी राणीच्या मत्त प्रधानास पकडून देहांत शिक्षा दिली पाहिजे. अशीं इतर कामें परमेश्वराच्या कृपेनें योग्य काळीं घडतीलच. असो. आतां उदईक सुवर्णपुरीस महाराजांना राज्याभिषेक करण्याकरितां सर्व मंडळींनीं यावें असें मी आमंत्रण करतों.

दत्ताजी—आपणां सर्वांचे एकदम व प्रत्येकाचे निरनिराळे आभार मानून–उद्याच्या राज्याभिषेक समारंभाला आता सर्वांनीं येऊन तो निर्विघ्न पार पाडावा अशी आमची इच्छा आहे.

सर्व०—आज्ञा शिरसावंद्य आहे. ( जातात ).

